# गुरुतत्त्व

वर्ष १ ले, अंक ४ था, ठाणे, ऑगस्ट - २०१७, पाने-४४ किंमत रुपये २५/-



## कधीही न पाहिलेले ब्रह्मांड हास्य

## "गुरुतत्त्व एक मार्गदर्शक"

# गुरुतत्त्व

वर्ष १ले, अंक ४था, ठाणे, ऑगस्ट-२०१७
पाने-४४, किंमत रुपये २५/-



: प्रकाशन/कार्यालय स्थळ :
श्री सद्गुरु प्रकाशन, सी/१०६, अयोध्यादर्शन,
साईबाबा मंदिरा समोर, न्यु आयरे रोड,
डोंबिवली (पूर्व) - ४२१ २०१.

अंकातील फोटो छायांकन : रोहिणी चंद्रशेखर संत

: अक्षरांकन व मुद्रण व्यवस्था :
श्री. सुरेश पैठणकर (रेणुका प्रिंट)

मुखपृष्ठ डिझायनिंग : श्री. नितीन भोसले
मुखपृष्ठ चित्रकार : श्री. चंद्रशेखर संत

मुद्रक : सद्गुरु प्रिंटर्स आणि पब्लिशर्स
सी/१०६, अयोध्यादर्शन, साईबाबा मंदिर समोर,
न्यू आयरे रोड, डोंबिवली (पूर्व) - ४२१ २०१.




## ।। शांती पाठ ।।

**ॐ भद्रं नो अपिवातय मनः।**
**।। ॐ शांतिः शांतिः शांतिः।।**

(हे परमेश्वरा) आमच्या मनाला कल्याणाकडे (मंगल) प्रेरित कर.

**यज्ञो व्रतं तपो दानं, जपतीर्थं तथैव च।**
**गुरुतत्त्वमविज्ञाय, मूढास्ते चरते जनाः ।।८।।**

यज्ञ, व्रत, तपश्चर्या, दानधर्म, जप गुरुगीता तीर्थयात्रा करणारे लोक जोवर गुरुतत्त्व जाणत नाहीत, तोपर्यंत मूर्खासारखे भटकतात, वागतात.

**वार्षिक सभासद वर्गणी रु. २००/-**
**सहा वार्षिक सभासद वर्गणी रु. १०००/-**
**: वर्गणी पाठविण्याचा पत्ता :**
श्री सद्गुरु प्रकाशन, सी/१०६, अयोध्यादर्शन,
साईबाबा मंदिरा समोर, न्यू आयरे रोड,
डोंबिवली (पूर्व), जि. ठाणे - ४२१ २०१.
ऑन लाईन सभासद वर्गणी भरण्यासाठी
Thane Janata Sahakari Bank Dombivli (East)
Current A/c : CD/020120100000814
IFSC TJSB 0000020
E-mail : shreegurutattva@gmail.com

हे मासिक प्रकाशक, मुद्रक, मालक श्री. संतोष श्यामराव जोशी यांनी युनिप्रिंट, चिंतामणी बिल्डींग, नमस्कार मंडळ समोर, आग्रा रोड, कल्याण (प.) येथे छापून, सी/१०६, अयोध्यादर्शन, साईबाबा मंदिर समोर, न्यू आयरे रोड, डोंबिवली (पूर्व) - ४२१ २०१. जि. ठाणे येथे प्रकाशित केले. **संपादक : श्री. संतोष श्यामराव जोशी R.N.I No. MAHMAR / 48634** लेखातील मजकुराशी संपादक / प्रकाशक/ सल्लागार सहमत असतीलच असे नाही.

# अंतरंग



**।। ऑगस्ट २०१७ - मुखपृष्ठ चित्र संकल्पना ।।**



**।। श्री स्वामी समर्थ ।।**

**चित्रकार : श्री. चंद्रशेखर ना. संत**

ज्या भाविकांना गुरु, सद्गुरु यांचे व्यक्तिचित्र काढायचे असेल त्यांनी प्रसिद्ध चित्रकार श्री. चंद्रशेख ना. संत यांच्याशी संपर्क करावा. **भ्रमणध्वनी : ८६५२४३०५९६**



## ।। स्वामी समर्थ तारक मंत्र ।।

नि:शंक हो, निर्भय हो, मना रे
प्रचंड स्वामीबळ पाठीशी रे
अतर्क्य अवधूत हे स्मर्तू गामी
अशक्यही शक्य करतील स्वामी ।।१।।

जिथे स्वामी पाय तिथे न्युन काय
स्वये भक्त प्रारब्ध घडवी ही माय
आज्ञेविणा काळ ना नेई त्याला
परलोकही ना भिती तयाला ।।२।।

उगाची भितोसी भय पळू दे
जवळी उभी स्वामी शक्ती कळू दे
जगी जन्ममृत्यु असे खेळ ज्यांचा
नको घाबरु तू असे बाळ त्यांचा ।।३।।

खरा होई जागा तू श्रद्धेसहित
कसा होशी त्याविण तू स्वामीभक्त
कितीदा दिला बोल त्यांनीच हात
नको डगमगू स्वामी देतील साथ ।।४।।

विभूती नमन नाम ध्यानादी तिर्थ
स्वामीच या पंच प्राणाभृतात
हे तिर्थ घे, आठवी रे प्रचिती
न सोडल स्वामी ज्या घेई हाती ।।५।।

# गुरुतत्त्व

## ।। संपादकीय ।।

### ।। श्री स्वामी समर्थ ।।

सर्व वाचकांना नमस्कार. 'गुरुतत्त्व' मासिकाचे चौथे पुष्प आपल्या समोर ठेवताना आनंद होत आहे. जुलै महिन्यात श्री नृसिंह सरस्वती यांच्यावरील माहितीपर लेखांचा समावेश अंकात केलेला होता, त्या अंकांचे वाचकांनी जोमात स्वागत केले, त्यामुळे अंकाचा खप दर महिन्याला वाढतच आहे, ही आमच्यासाठी खूपच समाधानाची गोष्ट आहे व आमचा अंक अधिक साधकांपर्यंत पोहोचतो आहे याचे समाधान आमचा उत्साह द्विगुणित करत आहे. 'गुरुतत्त्व' मासिक सद्गुरूंच्या आदेशनेच प्रकाशित झाले आहे. सद्गुरुंच्या कृपेनेच हे सगळे घडत आहे, यावर आमची पूर्ण श्रद्धा आहे. पुढील अंकांसाठी आमच्याकडे संतांची मालिका आहे व त्याचेही आपण स्वागत कराल ही अपेक्षा!

जुलै महिन्यातील अंकाचे विमोचन श्री नृसिंह सरस्वती महाराज यांचे जन्मस्थान श्रीक्षेत्र कारंजा-लाड येथे गुरुपौर्णिमेच्या दिवशी झाले, हे सर्व सद्गुरुंच्या आज्ञेप्रमाणेच घडत आहे. या सर्वांगीण सेवेसाठी सद्गुरुंनीच आम्हाला पात्र ठरविले, याबद्दल आम्ही सद्गुरुचरणी कृतज्ञता व्यक्त करतो.

ऑगष्ट महिन्याचा अंक हा '**श्री स्वामी समर्थां**'च्या कार्यावर अधोरेखित केला आहे. श्री नृसिंह सरस्वती महाराजांनी १४ जानेवारी १४५९ माघ प्रतिपदा, कृष्णपक्ष, सुर्य उत्तरायणात असताना संक्रांतीच्या कुंभपर्वावर पुष्पासनावर बसून निजानंदाला गेले. कर्दळी वनात त्यांनी कठोर अशी तपश्चर्या केली. ३०० वर्षानंतर, एके दिवशी उद्धव नावाचा लाकूडतोड्या कर्दळीवनात लाकूड तोडत असताना झाडाच्या खाली मोठमोठे वारुळ होते. उद्धवच्या हातून कुऱ्हाड निसटली, ती वारुळावर पडली. तेथून रक्ताची धार उडाली व क्षणातच दिव्य प्रकाशाचा झोत पडून वारुळ दूर होऊन त्यातून अजानबाहु, दिव्य कांती असलेली तेजस्वी अशी स्वामीमुर्ती प्रगट झाली. लाकूडतोड्या घाबरला. त्याने क्षमा मागितली. स्वामींनी त्याला क्षमा केली व पुढील अवतार कार्यासाठी तेथून बाहेर पडले. श्रीपाद चरित्रामृतमध्ये हा अवतार मी घेईन असे स्पष्ट विवेचन श्रीपादांनी केले होते. याचा उल्लेख अकराव्या अध्यायात आहे. जगाच्या कल्याणासाठी श्री दत्तात्रेयांचे अवतार सद्गुरु श्री स्वामी समर्थ या नावाने कार्यरत झाले. स्वामींच्या बखरीमध्ये याचा उल्लेख आहे की, स्वामी कर्दळी वनातून निघाल्यावर प्रथम कलकत्त्याला गेले, नंतर बांगला देश, हरिद्वार, केदारेश्वर इत्यादी स्थानांवर गेले. त्यानंतर स्वामी पंढरपूर, मोहोळ असे भ्रमण करीत सोलापूरला आले. सोलापूर जिल्ह्यातील मंगळवेढे या गावात काही काळ स्वामींनी वास्तव्य केले. तेथील भक्तांचे दुःख अडचणी दूर केल्या.



१८५६ मध्ये श्री स्वामी समर्थांचे अक्कलकोट येथे आगमन झाले. तेथे २२ वर्षे वास्तव्य केले. १८७८ साली त्यांनी आपले अवतारकार्य संपवून निजानंदनाला गेले. मात्र या काळामध्ये त्यांनी हजारो-लाखो भक्तांना अनंत अशा दुःख अडचणीतून मुक्त केले. त्यांनी भक्तांना आश्वस्त केले, 'भिऊ नकोस, मी तुझ्या पाठीशी आहे.' महाराजांच्या भक्तांमध्ये राजे-महाराजांपासून गरीबापर्यंत सर्व भक्त होते. त्यांचे प्रेम माऊलीप्रमाणे सर्वांवर होते. अक्कलकोट येथील वटवृक्षाखाली त्यांचा दरबार लागायचा. तिथे अचंबित करणाऱ्या अनेक अनुभूती भक्तांना चकित करायच्या. त्यातील निवडक अनुभूतींच्या संग्रहांची नोंद तेथील बखरीमध्ये आहे, व ती साधकांसाठी उपलब्ध आहे. त्यात अनेक अननुभूती भक्तांना स्वामींनी दिलेल्या आहेत.

आज स्वामींनी देह ठेवून १३९ वर्षे झाली, पण आजही भक्तांना स्वामींच्या अनुभूती येत आहेत. कारण हे गुरुतत्त्व आहे. हे तत्त्व पृथ्वीच्या उत्पत्तीपासून लयापर्यंत राहणार आहे. म्हणून भक्त ज्या तळमळीने हाक मारतो, त्याप्रमाणे हे तत्त्व त्या रुपात कार्यरत होते.

।। जय गुरुदेव दत्त - दत्त - दत्त.।।

■■■

# 'गुरुतत्त्व' मासिकाच्या तिसऱ्या पुष्पाचे विमोचन!



**गुरुमंदिर संस्थानचे अध्यक्ष श्री. नारायण खेडकर, 'गुरुतत्त्व'चे संपादक श्री. संतोष जोशी, संस्थानचे विश्वस्त श्री. प्रकाश गुढे**

गुरुपौर्णिमेच्या शुभ मुहूर्तावर 'गुरुतत्त्व' जुलै अंकाचे विमोचन श्री नारायणराव खेडकर ह्यांच्या हस्ते झाले. श्रीक्षेत्र कारंजा लाड हे स्थान श्री नृसिंह सरस्वती यांचे जन्मस्थान. या पवित्र स्थानावर उभारलेल्या गुरुमंदिरामध्ये दि. ९-७-२०१७ रोजी, गुरुपौर्णिमेच्या मुहूर्तावर, गुरुमंदिर संस्थानचे अध्यक्ष श्री. नारायणराव खेडकर यांच्या शुभहस्ते झाले.

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन गुरुमंदिर संस्थानाचे विश्वस्त श्री. प्रकाश गुढे यांनी केले. कार्यक्रमाच्या प्रास्ताविक भाषणात 'गुरुतत्त्व' मासिकाचे संपादक श्री. संतोष श्यामराव जोशी म्हणाले, 'आजच्या अनुपम अशा मुहूर्तावर नृसिंह सरस्वती यांच्यावर आधारित गुरुतत्त्व मासिकाचे प्रकाशन, त्यांच्याच जन्मभूमीत व्हावे, ही एक अलौकिक प्रचिती आहे. हे कार्य आमच्याकडून सद्गुरु करवून घेत आहेत. आमची पात्रता नसतानाही 'गुरुतत्त्वा'चा प्रचार व प्रसार करण्याचे महत्तम कार्य आमच्याकडून सद्गुरूच करवून घेत आहेत. त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करतो. हे कार्य उत्तरोत्तर वाढतच आहे, यात सर्व दत्तभक्त सहभागी होत आहेत. ''सद्गुरुचरणी हीच प्रार्थना आहे की आमच्यावर सोपविलेली सेवा आमच्या हातून नि:स्वार्थपणे घडावी'' सद्गुरुंचे असेच बळ व आशिर्वाद लाभावे. हीच आमची सद्गुरुंजवळ प्रार्थना आहे.

श्री. नारायण खेडकर यांनी आपल्या मनोगतामध्ये म्हटले की, आजच्या दिवशी या मासिकाचे विमोचन गुरुमंदिर येथे होणे ही महाराजांचीच इच्छा आहे, याची प्रचिती सगळ्यांनाच येत आहे. यावरून हे सिद्ध होते की, 'गुरुतत्त्व' मासिक सद्गुरुंच्या तत्त्वाचा प्रचार-प्रसार करण्यासाठी कटिबद्ध आहे, हे उद्दीष्ट लक्षात ठेवून व्यवस्थापक व संपादक मंडळ या दृष्टीने प्रयत्न करतील याची मला खात्री आहे. मासिकातील अंकाची मांडणी रेखीव व वाखाणण्याजोगी आहे. अंकाची छपाई त्यास पूरक आहे व मुखपृष्ठ लक्षवेधी आहे. 'गुरुतत्त्व' या मासिकातील लेख हे अभ्यासपूर्ण आहेत. लेखकांनी मनोभावे व प्रयत्नपूर्ण लिखाण करून दत्तगुरुंच्या भक्तांना भक्तीमार्गाचा अलौकिक साठा प्रदान केला आहे.

'गुरुतत्त्व' मासिकातून त्यांनी लुप्त असलेल्या दत्तस्थानांना जनसामान्यांपर्यंत पोहोचविण्याचे पवित्र कार्य त्यांनी केले आहे व यापुढेही करणार आहेत. याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. 'गुरुतत्त्व' मासिकाची प्रगती उत्तरोत्तर होत राहो, हीच सद्गुरुचरणी अभिलाषा! सर्वांनी 'गुरुतत्त्व' मासिकाचे सभासद व्हावे व या महान कार्यात पूर्णता आणावी.

श्री. नारायण खेडकर यांच्या मनोगतानंतर त्याच्या हस्ते 'गुरुतत्त्व' मासिकाच्या तिसऱ्या अंकाचे विमोचन करण्यात आले. 'गुरुतत्त्व' मासिकाच्या स्टॉलला भेट देवून भाविकांनी सभासदत्व स्वीकारले. अशाप्रकारे सद्गुरुंच्या आशिर्वादाने श्री नृसिंह सरस्वतींच्या जन्मस्थानी गुरुमंदिरात विमोचनाचा सोहळा पार पडला.

■■■

# ।। ॐ श्री स्वामी समर्थ ।।

श्री. गणेश हरी कुलकर्णी, सम्पर्क : ९८६९११८७८८



**कन्यागती बृहस्पतीसि । बहु धान्य नाम संवत्सरेसि ।**
**सूर्य चाले उत्तर - दिगंतेसी । संक्रांती कुंभ परियेसा ।।३६।।**
**शिशिर ऋतु माघमासी । असित पक्ष प्रतिपदेसि ।**
**शुक्रवारी पुण्यादिवशी श्री गुरु बैसले निजानंदी ।।३७।।**
**-श्री गुरुचरित्र अध्याय-५१**

माघ वद्य प्रतिपदा, शुक्रवारी बहुधान्य नाम संवत्सर, उत्तरायण, शके १५३७ इ.स. १४५९ या दिवशी श्रीनृसिंह सरस्वती यांनी श्री शैल्य येथे कर्दळी वनात प्रवेश केला व ते गुप्त झाले. दत्तात्रेयांचा मनुष्य देहातील हा श्रीनृसिंहसरस्वती यांचा अवतार समाप्त झाला. इ.स. १३८० ते इ.स. १४५९ असा हा ८० वर्षांचा कालखंड श्रीगुरु नृसिंह सरस्वती निजानंद गमनास जाताना आपल्या भक्तांना म्हणाले,

**आम्ही असतो याचि ग्रामी । नित्य स्नान अमरजा संगमी।**
**वसो मठी सदा प्रेमी । गौप्य रुपे अवधारा ।।१४।।**
**लौकिक मते आम्ही जातो । ऐसे दृष्टांनी दिसतो।**
**भक्तजना घरी वसतो । निर्धार धरा मानसी ।।३४।।**

(गुरुचरित्र अ. ५१)

श्री नृसिंह सरस्वती यांनी मी नित्य आपल्या घरात आहे. स्मरण करताच मी आपल्या समोर प्रकट आहे. असे स्मृतगामी दत्तात्रेयांचे स्वरूप त्यांनी सर्व भक्तजनास सांगितले. मात्र स्वत:हून त्यांनी आपल्या भावी अवतरणाविषयी मौन बाळगले.

श्रीपाद श्रीवल्लभांनी मात्र आपल्या हयातीत आपल्या भावी अवताराविषयी सविस्तर कथन केले होते. असा स्पष्ट उल्लेख श्रीपाद श्रीवल्लभ यांच्या चरित्रात आला आहे. श्री नृसिंह सरस्वती व श्री स्वामी समर्थ या दोन अवताराविषयी त्यांनी भविष्यवाणी केली होती. तो तपशील सविस्तरपणे पाहू.

श्रीपाद श्रीवल्लभ सर्वगुण संपन्न अशा शिवशर्मा ब्राह्मणाची पत्नी वासवांबिका (पुढील जन्मात माधवपानी अंबाभवानी) हिला श्री दत्तप्रभू श्रीपाद श्रीवल्लभ म्हणाले, तुझा संकल्प सिद्ध होईल. मी तुझ्या पोटी जन्म घेईन. मी आणखी १४ वर्षे म्हणजे या शरीराला ३० वर्ष होईपर्यंत श्रीपाद श्रीवल्लभ म्हणून कुरवपुरात राहीन. नंतर गुप्त होऊन संन्यास धर्माच्या उद्धाराच्या निमित्ताने नृसिंह सरस्वती या नावाने अवतार घेऊन ओळखला जाईन. त्या माझ्या दुसऱ्या अवतारात मी ८० वर्षे असेन. त्यानंतर मी ३०० वर्षे तपोनिष्ठ राहून, गुप्त राहून प्रजापुरात म्हणजे सध्याचे अक्कलकोट या ठिकाणी **स्वामी समर्थ** म्हणून अवतार धारण करेन.

अवधूत अवस्थेत सिद्ध पुरुषाच्या रुपाने मी अपरिमित अशा दिव्य कांतीने अगाध लीला प्रकट करेन. साऱ्या जगताला धर्म व कर्माला अनुसरून त्याविषयी आसक्तीरहित करेन. अक्कलकोट येथील वटवृक्षात माझी प्राणशक्ती प्रवेश करेल. त्यानंतर मी श्रीशैल्य येथे मल्लिकार्जुन लिंगात प्रवेश करेन.

अशा प्रकारे श्रीदत्तगुरु श्रीपाद श्रीवल्लभ यांनी आपल्या या भावी अवताराची भविष्यवाणी सांगितली होती. श्रीपाद श्रीवल्लभांनी ही गोष्ट आपले आजोबा



बापन्नाचार्यांना आपल्या लहानपणीच सांगितली होती.

श्रीपाद श्रीवल्लभांनी स्वत:विषयी आपला ३० वर्षांचा कालखंड सांगितला होता. त्यांच्या या अवतारात अप्पलराज शर्मा व सुमतीराणी हे त्यांचे माता-पिता होते. दोघांनाही त्यांच्या पूर्वजन्मात म्हणजे विष्णुदत्त व सोमदेवम्मा असताना मी पीठापुरात तुमच्यापोटी जन्म घेईन असे प्रत्यक्ष दत्तात्रेयांनी त्यांना सांगितले होते.

श्री नृसिंह सरस्वतींच्या अवतारात कारंजा येथे अंबाभवानी व माधव यांच्या पोटी त्यांचा जन्म झाला. त्याबाबत व त्यांच्या ८० वर्षाच्या कालखंडाविषयी श्रीपाद श्रीवल्लभांनी स्पष्ट सांगितले होते.

श्रीस्वामी समर्थांच्या बाबतीत मात्र त्यांनी केवळ ३०० वर्षे गुप्त राहून अक्कलकोट येथे स्वामी समर्थ म्हणून मी प्रकट होईन, इतकेच सांगितले. साक्षात श्रीपादांनी मी स्वामी समर्थ म्हणून प्रकट होईन, असे सांगितले असल्याने, श्री स्वामी समर्थ हे दत्तात्रेयांचेच अवतार आहेत. याबाबत काही संशय नाही. महत्वाची गोष्ट म्हणजे पूर्वीच्या अवताराप्रमाणे त्यांनी श्री स्वामी समर्थ या अवतारात त्यांचे माता-पिता कोण असणार? ते कुठे प्रकट होणार? ते किती काळ या भूतलावर असणार? याबाबत त्यांनी स्पष्ट सांगितले नाही. त्यांच्या दुसऱ्या अवतारात श्री नृसिंह सरस्वती यांनी तर काहीच सांगितले नाही. त्यामुळे श्री स्वामी समर्थ यांचा हा तिसरा अवतार अत्यंत गूढ असा आहे. प्रत्यक्ष दत्तात्रेयांनी मी स्वामी समर्थ म्हणून प्रकट होणार असे सांगितल्यामुळे ते दत्तावतार आहेत, यात शंका नाही.

श्री स्वामी समर्थ हे दत्तात्रेयांचे अवतार होते. याबाबत दोन महत्त्वाच्या व्यक्तींचा उल्लेख करीत आहे. श्री स्वामी समर्थांची एक शिष्या होती. तिचे नाव जनाबाई असे होते. ती शूद्र वर्णाची स्त्री होती व पंढरपूरच्या विठ्ठलाची निस्सीम भक्त होती. ती नित्य वारी करीत असे. एकदा खूप पाऊस आला. तिची एकादशीची वारी कशी काय होणार म्हणून ती काळजीत होती. जनाबाई ही मंगळवेढ्यात राहत होती. त्यावेळी स्वामी समर्थ हे मंगळवेढ्यात राहत होते. जनाबाईचा भाव त्यांनी ओळखला व ते कमरेवर हात ठेवून जनाबाईसमोर उभे राहिले. साक्षात विठ्ठल मूर्तीचे दर्शन जनाबाईस झाले. तिचे वारीचे व्रत पूर्ण झाले. स्वामी समर्थ यांच्या रुपात प्रत्यक्ष पांडुरंगाने तिला दृष्टांत दिला व तिच्यावर अनुग्रह झाला. जनाबाई त्यानंतर मंगळवेढ्यात स्वामी सेवेत राहिली.

ही जनाबाई पुढे ओव्या करीत होती. ती एका ओवीमध्ये म्हणते-

**अवतारही उदंड होती । सवेचिमागुति विलया जाती।**
**तैसी नव्हे दत्तात्रेय मूर्ति । नाश कल्पांती असेना।।**



जनाबाई म्हणते, अवतार उदंड होतात व नंतर ते विलयाप्रत जातात. पण स्वामी समर्थ यांना तिने जरी विठ्ठलाच्या रुपात पाहिले असले, तरी ती म्हणते ही दत्तात्रेय मूर्ती व अविनाशी अशी आहे. नित्य आहे सनातन आहे.

स्वत:ला संत ज्ञानेश्वर महाराजांची कन्या म्हणून समजणारे प्रज्ञाचक्षु अंध गुलाबराव महाराज हे ज्ञानेश्वराचे भक्त होतेच. पण स्वामी समर्थांवर त्यांची अपार श्रद्धा व प्रेम होते. ते म्हणतात-

**देवा दीन मी पदरीधरा । कलियुगी श्री**
**दत्तात्रेय अवतार तुमचा खरा । अक्कलकोट**
**निवासी ब्रह्म । सगुण हृदयी उत्तरा।।**

जन्मांध पण प्रज्ञाचक्षु गुलाबराव महाराज श्री स्वामीचा दत्तात्रेय अवतार म्हणून उल्लेख करतात. परावाणीतून हा अभंग आला आहे.

**सूक्तीरत्नावली या काव्य संग्रहात हा अभंग आहे**

कर्नाटकात हुमणाबाद येथे श्री माणिकप्रभू यांचे स्थान आहे. श्री माणिक प्रभू हे पण दत्तावतार म्हणून समजले जातात. एकदा त्यांची व स्वामी समर्थांची भेट झाली, तेव्हा ते म्हणाले- अनंत कोटी ब्रह्माण्डनायक अक्कलकोटी प्रकटणार आहेत.

श्री स्वामी समर्थांच्या बाबतीत या गोष्टी सांगण्याचे कारण, स्वामी समर्थ यांचा हा दत्तावतार अत्यंत गूढ असा आहे. स्वामी कुठून आले? स्वामी हे कुणाचे अवतार? स्वामींचे वय काय? स्वामींच्या संदर्भात हे प्रश्न अनुत्तरित आहेत. स्वामी समर्थ यांनी स्वत: आपली ओळख त्यांचे निजिशिष्य वामनबुवा वामोरीकर यांना करून दिली. तो प्रसंग सविस्तरपणे पाहू. वामनबुवा हे स्वामी समर्थांचा उल्लेख दत्तात्रेय असाच करीत होते.

वामनबुवा वामोरीकर इ.स. १८६३ मार्गशीर्ष महिना शुक्लपक्ष, षष्ठी तिथीला अक्कलकोट येथे श्री स्वामी समर्थ यांना भेटण्यास आले. दत्तात्रेयांनी वामनबुवांना स्वप्नात दृष्टांत दिला. दत्तात्रेय म्हणाले, मी नरवेशात अक्कलकोट (प्रज्ञापूर) येथे प्रकट झालो आहे. तू तिथे जा म्हणजे तुझे समाधान होईल.

वामन बुवांनी आपले वडील वा गुरुची आज्ञा घेवून वामोरी येथून नगरला पायी आले. नंतर दौंडवरून कुर्डुवाडीस आले व पायी चालत सोलापूरमार्गे अक्कलकोटास पोहोचले. त्या ठिकाणी स्वामीभक्त चोळप्पा यांच्या घरी गेले. त्यानंतर श्री स्वामींची चौकशी करीत गाणगापुर करून ख्वाजापिरास वंदन करून एका गावी पयोनदीच्या काठी आले. स्वामी एका शेतात होते. स्वामींना वामनबुवा कशाप्रकारे अंतरीच्या ओढीने आले आहेत ते कळले होते. वामनबुवांनी श्री स्वामी समर्थांना पयोनदीत उटणे लावून आंघोळ घातली. त्यांचे अंग पुसून त्यांच्या गळ्यात फुलांचा हार घातला. त्यांची आरती केली व त्यांना साष्टांग नमस्कार घातला.

श्री स्वामी समर्थांनी मोठ्या स्वरात महामंत्राचा उपदेश दिला. वामनबुवांची खूप दिवसांची इच्छा पूर्ण झाली. स्वामी समर्थांनी त्यांना उपदेश केला व अनुग्रह दिला. मंत्राचे न्यास आदी सांगून, त्यांनी वामनबुवांना अवधूत गीतेचा तारक मंत्र दिला. साक्षात शिवानी ज्या मंत्राची रचना केली, तो गुरुमंत्र त्यांनी मोठ्या आवाजात वामनबुवांना ऐकविला.

**ध्यान मुलम् गुरोः मूर्ती । पूजा मुलम् गुरौः पदम्।**
**मंत्र मूलम् गुरोंवाक्यम् । मोक्षमूलम् गुरोःकृपा।।**

-अवधूतगीता

असे म्हणून श्री स्वामी समर्थ वामनबुवांना म्हणाले- तू ब्रह्मनिष्ठ होशील. वैदिक मर्यादा सांभाळ व आमच्या सेवेत असावे. त्यावेळी दत्तात्रेयांना म्हणजे स्वामी समर्थांना कुणी एकानी प्रश्न केला. आपण कोण आहात? त्यावर श्री स्वामी समर्थ म्हणाले,

**पुन्हा तुम्ही विचारु नये, मूळ पुरुष दत्तनगर वटवृक्षावर वसती करून असतात. आम्ही यजुर्वेदी**

म्हणून स्वामींच्या आज्ञेने त्यांनी **श्रीगुरुगीता लीलामृत या ५५ अध्यायांचे ओवीबद्ध चरित्र लिहिले. या चरित्राच्या एकूण ९७५७ ओव्या आहेत.**

श्री स्वामी समर्थ यांच्या चरित्रासंदर्भात केवळ याच एका कारणाने '**श्रीगुरुगीतालीलामृत**' या ग्रंथाचा आधार घेतला आहे. कारण वामनबुवांनी स्वामी समर्थांच्या आज्ञेने तो लिहिला आहे. बोलविता धनी प्रत्यक्ष श्री स्वामी समर्थ म्हणजे दत्तप्रभू आहेत.

श्री स्वामी समर्थ यांच्या चरित्र लेखकाचा म्हणजे श्री वामनबुवा वामोटीकर अहमदनगर जिल्ह्यामधील वामोटी या गावी १८-८-१८४८ साली जन्माला आले. स्वामी समर्थ यांनी तू ब्रह्मनिष्ठ होशील, असा आशीर्वाद वामनबुवांना दिला होता. असे हे ब्रह्मनिष्ठ वामनबुवा वामोटीकर यांनी संन्यास आश्रम घेतला व **अद्वैतानंद** असे नाव धारण केले. २५-३-१९०१ या दिवशी वामनबुवांनी देह ठेवला. वामनबुवा वामोटीकर हे प्रत्यक्ष श्री स्वामी समर्थ यांच्या सान्निध्यात होते. लहानपणापासून धार्मिक व वेदांती असा त्यांचा नावलौकिक होता. स्वरोदय शास्त्राचा अभ्यास करून ते योगसाधना करीत होते. गुरुची भेट व्हावी, अशी आशा असताना त्यांना कळले की, अक्कलकोट येथे श्री स्वामी समर्थ म्हणून प्रत्यक्ष दत्तात्रेय आहेत. तेव्हा ते स्वामींच्या दर्शनास आले. पहिल्याच भेटीत स्वामी समर्थांनी त्यांच्या अंगावर कौपीन फेकले व हातात कमंडलु दिला. स्वत: स्वामींनी अशाप्रकारे त्यांना संन्यासदीक्षा दिली. त्यानंतर **श्री स्वामी समर्थ** या षड्अक्षरी मंत्राचा त्यांनी अखंड जप केला. प्रकृती अस्वाथ्यामुळे वामनबुवांनी आत्महत्येचा प्रयत्न केला. स्वामी समर्थ त्या ठिकाणी प्रकट झाले व शिव्या देवून भोग भोगल्याशिवाय सुटका होत नाही म्हणून त्यांना परावृत्त केले व दत्तात्रेय स्वरूपात त्यांना दर्शन दिले. त्यांच्या अंगावर अवधूत गीतेची पोथी फेकून दिली.

हा परिचय देण्याचे कारण चरित्रकर्त्याचा अधिकार पण महत्त्वाचा असतो. त्यामुळे स्वामींचे जे काही जीवन आहे, त्यांनी ज्या काही लीला प्रकट केल्या, जो काही उपदेश केला, तो मुळातून हा ग्रंथ वाचून पारायण करून अनुभवला पाहिजे. श्रीगुरुचरित्र हे जसे नृसिंह सरस्वतींचे दर्शन करून देणारे आहे. तसाच हा श्री गुरुलिलामृत ग्रंथ



श्री स्वामी समर्थ यांचे प्रत्ययकारी दर्शन करून देणारा आहे. गुरुभक्ती म्हणजे गुरुलीला व गुरुवचनाचे चिंतन म्हणून हा ग्रंथ म्हणजे गुरुसान्निध्य असते. गुरुचे सान्निध्य म्हणजे परब्रह्माचे सान्निध्य प्रत्यक्ष ज्ञानाचे सान्निध्य प्रत्यक्ष दर्शन.

श्री स्वामी समर्थ हे दत्तात्रेयांचे कलियुगातील तिसरे मनुष्य अवतार म्हणून विख्यात आहेत. श्री स्वामी समर्थ यांच्या जन्माविषयी त्यांच्या माता व पित्याविषयी, गुरुविषयी काहीच माहिती नाही. त्यामुळे त्याच्याविषयी एक गूढ वलय आहे. त्यांनी नक्की कोणत्या दिवशी जन्म घेतला हे माहीत नाही. मात्र चैत्र वद्य त्रयोदशी मंगळवार बहुधान्य संवत्सर शके १८०० इ.स. १८७८ या दिवशी त्यांनी देह ठेवला, अशी माहिती आहे.

श्रीपाद श्रीवल्लभ यांनी जे भविष्यातील कथन केले व श्रीपाद श्रीवल्लभ तसेच श्रीनृसिंह सरस्वती यांच्याविषयी जी माहिती आहे, त्याच्या आधारे आपण स्वामी समर्थांच्या निर्वाणापासून अंदाज घेवू शकतो.

श्री नृसिंह सरस्वती हे इ.स. १४५९ या वर्षी निजानंद गमनास गेले. श्रीपादांनी सांगितले होते की,

नृसिंह सरस्वती या माझ्या अवताराचे वेळी मी ३०० वर्षे श्री स्वामी समर्थ प्रकट झाले. इ.स. १८७८ या वर्षी त्यांनी आपले अवतार कार्य समाप्त केले. म्हणजे इ.स. १७५९ ते इ.स. १८७८ हा काळ पाहिला तर श्री स्वामी समर्थ यांचे वय ११९ वर्षा इतके येते. कलियुगाची आयुष्यमर्यादा ही ज्योतिष शास्त्र दृष्ट्या विशोत्तरी दशा पद्धतीनुसार १२० वर्षाची निश्चित केली आहे. देवता या अजन्मा असल्याने त्यांच्या वयाचा प्रश्न नसतो. त्या अनादि, अनंत, चिरंजीव, मात्र विदेही असतात. देहातील व्यक्तींना आयुष्याची कालमर्यादा असते. ती १२० वर्षे निश्चित केली आहे. मात्र योगीलोक देह हवे तितके वर्षे धारण करु शकतात. हा अपवाद आहे. त्यामुळे समाधी दिवसापासून उलट क्रमाने श्री स्वामी समर्थ यांचे वय ११९ वर्षांचे आहे. ३०० वर्षांच्या गुप्तकाळ जर हिशेबात घेतला तर ते ४१९ वर्षे इतके येते.

नदीचे मूळ व ऋषींचे कुळ पाहू नये, असा संकेत आहे. स्वामी समर्थ हे साक्षात् दत्तप्रभू आहेत. आणि ईश्वराचे स्वरूप हे अगम्य आहे. ते बुद्धीच्या पलिकडे आहे. परंतु बुद्धीप्रामाण्याचे पण महत्त्व आहे. **बुद्धी हे ज्ञानाचे एक साधन आहे. बुद्धी संशय निर्माण करणारी आहे. आणि बुद्धी संशय दूर करणारी पण आहे.** ज्ञानाचे साधन म्हणून कुणी बुद्धीचा आश्रय करीत असेल तर अशी व्यक्ती नास्तिक व अश्रद्ध आहे, असे म्हणता येत नाही. म्हणून एक नियम ध्यानात घ्यावा लागतो. जेव्हा एखादा साधक, जिज्ञासु हा निम्न स्तरावर असतो, तेव्हा बुद्धिजन्य ज्ञान त्याचे समाधान करीत असते. पण बुद्धीच्या पलिकडील गोष्टी व बुद्धीच्या मर्यादा यांचा विचार केला, तर साधकांचे जिज्ञासूंचे समाधान हे वरच्या स्तरावर गेल्यावरच होते. साधनेच्या द्वारे ते होते. स्वामीकृपेनेच ते होते. त्यासाठी अनुसंधानाची व भक्तीची, श्रद्धेची गरज असते. देवता व त्या विषयीचे ज्ञान हे अशाप्रकारे गुरुकृपा होते, तेव्हाच होते. त्यांचे चरण धरल्यावर हा सर्व विषय आपोआप सुलभ व स्पष्ट होतो. हे ध्यानात घ्यावे. म्हणून हा प्रपंच.

श्री नृसिंह सरस्वतींच्या अवतारासंबंधी असे म्हणतात-

**श्री नृसिंह सरस्वती पुरतुनी की हिंडले भारती।**
**ते हे अक्कलकोटचे यति असे श्रद्धाबळे मानिती।।**
**बालोन्मत्त पिशाचवत् स्थितीमध्ये त्या काळी ते नांदले।**
**त्यांचे अद्‌भुत गूढ जीवन असे दत्तावतारी भले**

-श्री गुरु लीलामृत

नृसिंह सरस्वती यांनीच अक्कलकोटचे नृसिंह यति म्हणून जन्म घेतला, तेच हे स्वामी समर्थ आहेत. वामनबुवा वामोटीकरांनी नृसिंहयति असा उल्लेख केला आहे. नृसिंह स्वामी असा उल्लेख केला आहे.

कर्दळी वनातून प्रकट झालेले श्री स्वामी समर्थ भारतभर संचार करून इ.स. १८३५ साली मंगळवेढा येथे प्रकट झाले. कर्दळी वनात ते इ.स. १४५९ यावर्षी गुप्त झाले. ३०० वर्ष त्याचे तपसाधना करून ते इ.स. १७५९ पर्यंत गुप्त होते. जेव्हा इ.स. १८३७ साली ते मंगळवेढा येथे आले. तेव्हा त्यांचे वय ७८ वर्षांचे होते. हा ७८ वर्षांचा काळ भारत भ्रमणाचा होता. हिमालयापासून ते संचार करीत होते. त्यावेळी चैतन्य, चंचल भारती, नृसिंहयति, दिगंबरबुवा, नृसिंहभान, अक्कलकोट स्वामी अशा अनेक नावानी ते वावरत होते.

मंगळवेढ्यात महाराज १२ वर्षे राहिले. त्यानंतर स्वामी पंढरपूर बेगमपूर चळेंबे असे फिरत फिरत मोहोळ येथे आले. त्या ठिकाणी स्वामी ५ वर्षे राहिले. आणि १८५४-५५ या वर्षात ते अक्कलकोट या ठिकाणी आले. त्यावेळी स्वामींना श्री स्वामी समर्थ हे नाव प्राप्त झाले. अक्कलकोट येथील खंडोबाच्या देवळात ते होते. रहिमतखान महंमद अली या मुसलमानाने स्वामींना पाहिले, तेव्हा कोणी महान अवलिया आहे म्हणून त्यांनी स्वामींना चोळप्पाच्या घरी नेले. तेव्हापासून २२ वर्षे अक्कलकोट येथे श्री स्वामी समर्थांचा वास होता. अखेरीस स्वामींनी देह अक्कलकोट येथेच ठेवला. चोळप्पाच्या घरी पूर्व नियोजित ठिकाणी त्यांची समाधी आहे. स्वामी नेहमी त्या ठिकाणी बसत होते.

आजही स्वामींचा दृष्टांत भक्तांना होत असतो. ज्याप्रमाणे नृसिंह सरस्वती म्हणाले होते, आम्ही गाणगापूरला नित्य वास करून असतो. तसेच स्वामी समर्थ भक्तांसाठी नित्य अक्कलकोटमध्ये वास करून आहेत.

स्वामींनी देह ठेवला, त्यानंतर तीन दिवसांनी वामनबुवा वामोटीकर अक्कल कोटास आले. सर्व दिवस झाले. स्वामींची वस्त्रे निजिशिष्यांना वाटण्यात आली. श्री स्वामी समर्थांनी मंगळवारी समाधी घेतली. पण ५ दिवसानंतर शनिवारी स्वामी समर्थ हे निलेगाव येथे आले व शिष्यांसह झाडाखाली बसले. कारभारी भाऊसाहेब धावत आले. तेव्हा स्वामी म्हणाले, आम्ही उद्या येवू. संध्याकाळी झाडाखाली कोणीही नव्हते. रविवारी

स्वामी प्रकट झाले. पण न बोलता गुप्त झाले. आपल्या भक्तांना ते भेटत होते. दत्तात्रेयांच्या अवताराचे हे साम्य आहे म्हणून आज देखील पीठापूर, कुरवपूर, औदुंबर गाणगापूर नृसिंहवाडी व अक्कलकोट या ठिकाणी दत्तात्रेय आपल्या भक्तांना दर्शन देतात. त्यांची मनोकामना पूर्ण करतात.

श्री गुरुचरित्राप्रमाणे श्री गुरुलीलामृतामध्ये स्वामींच्या लीला आहेतच. पण श्रीगुरुचरित्रापेक्षाही अधिक विस्ताराने वेदांत व तत्त्वज्ञान, उपनिषद यावर चर्चा केली आहे. ब्रह्मनिष्ठ वामनबुवांनी ती सोपी करून सांगितली आहे. सदर लेखात चरित्र हा भाग असल्याने त्याच्या लीला व अन्य विषय हा स्वतंत्र विषय आहे, मुळातून तो वाचला पाहिजे. श्री. मोहनराव वसंत वैद्य यांनी **श्री स्वामी समर्थ कोष** या नावाचा एक ग्रंथ लिहीला आहे. त्यामध्ये स्वामींचा सहवास लाभलेले व स्वामींची कृपासंकल्प दीक्षा प्राप्त झालेले असे ४० ते ४५ व्यक्तीचे अनुभव व माहिती दिलेली आहे. तसेच स्वामी समर्थ यांच्या २०३ लीलांचा समावेश केला आहे. श्री स्वामी समर्थ यांच्या संदर्भात साधारणपणे छोटीमोठी अशी ३५० ते ४०० पुस्तके प्रसिद्ध आहेत. अनेकांनी त्यांची चरित्रे लिहिली आहेत. ओवीबद्ध चरित्रे स्वामींचे चमत्कार स्वामींचे गूढ असे बोलणे व वागणे यांचे शास्त्रशुद्ध विवेचन पण करण्यात आले आहे.

श्री स्वामी समर्थ यांचे परमभक्त श्री हरिभाऊ तावडे, ज्यांना स्वामीसुत असे म्हणतात. त्यांनी स्वामी समर्थांच्या बाबतीत केलेला उल्लेख महत्त्वाचा आहे. हिमाचल प्रदेशात टिहरी गढवाल म्हणून एक संस्थान आहे. त्या ठिकाणी छेलीखेडा म्हणून एक गाव आहे, त्या गावाच्या राजाचा पुत्र विजयसिंह म्हणून होता. आपल्या मित्रासमवेत खेळत असताना चैत्र शु. द्वितीया शके १०७१ म्हणजे इ.स. ११४९ या दिवशी श्री स्वामी समर्थ आठ वर्षांच्या बालक स्वरूपात प्रकट झाले, असे वर्णन आले आहे. त्याप्रमाणे श्री स्वामी समर्थांचे वय ७२९ वर्षे असे वर्णन केले आहे.

नृसिंह सरस्वती कर्दळी वनात गुप्त झाले. तेथे त्यांनी तप केले. मुंग्यांनी वारुळ धरले. एकदा एका लाकूडतोड्याने फांदी तोडत असताना कुऱ्हाड वारुळावर पडली व नृसिंह सरस्वतींच्या मांडीला जखम झाली व त्यातून रक्त आले. नृसिंह सरस्वती तपातून बाहेर आले. दिगंबर दास महाराज म्हणून श्री स्वामी समर्थांचे शिष्य होते, ते या संदर्भात म्हणतात-

**तुझे वियोगी प्रकटलो पुनरपि भूजळी।**
**नाम माझे नृसिंह सरस्वती।।**
**ऐसे तयासी कथून । अनुग्रह केला पूर्ण।।**

अशा तऱ्हेने नृसिंह सरस्वतींनी त्या लाकूड तोड्यावर अनुग्रह केला. श्री नृसिंह सरस्वती अशा प्रकारे पुढे श्री स्वामी समर्थ म्हणून प्रकट झाले. समाधीतून बाहेर आल्यावर श्री नृसिंह सरस्वती हे कर्दळीवनातून श्री स्वामी समर्थ म्हणून बाहेर पडले व भ्रमंती करत ते इ.स. १८५६-५७ या वर्षी अक्कलकोट येथे आले.

श्री स्वामी समर्थांनी स्वमुखानी एक हकिकत सांगितली. एकदा एका कलकत्याच्या पारशी व्यक्तीने स्वामी समर्थांना प्रश्न केला. आपण कुठून आलात? तेव्हा स्वामी समर्थ म्हणाले, 'आम्ही कर्दळी वनातून निघालो. संचार करीत कलकत्ता येथे आलो. बंगाल देश फिरुन कालीमातेचे दर्शन करून हरिद्वार, केदार अशा ठिकाणी हिंडून गोदातटाकी आलो. नंतर पंढरपूर, बेगमपूर, मोहोळ, सोलापूर करून अक्कलकोटास आलो.

हिमालयात असताना एका चिनी कुटुंबाचे गर्वहरण केले व त्यांना अनुग्रहीत केले. एका तपोनिष्ठ अशा संन्याशाला दत्त दर्शन घडविले. जगन्नाथपुरी या ठिकाणी स्वामी समर्थ काही काळ होते. त्यानंतर स्वामी म्हणाले, आम्ही सह्याद्री, गिरनार, काशी, मातापुर म्हणजे माहुरगड, कोल्हापूर, पाताळेश्वर, औदुंबर, कारंजा, नृसिंहवाडी व गाणगापूर या माझ्या प्रिय ठिकाणी वास्तव्य केले. त्या काळात श्री स्वामी समर्थ हे चंचलभारती, चैतन्य नृसिंह सरस्वती, मंगळवेढ्यातील दिगंबरबुवा व अक्कलकोट येथे अक्कलकोट स्वामी या नावानी राहिले. चिंतोपंत टोळ ह्या त्यांच्या शिष्यानी स्वामींना अक्कलकोट येथे आणले.

श्री स्वामी समर्थ अक्कलकोट जवळ खंडोबाच्या देवळात अश्विन शु. पंचमी इ.स. १८५७ मध्ये प्रकट झाले. पिशाश्च वृत्ती लहरी वागणे होते. त्यांना स्नान दुसऱ्यांनी घालावे, अन्न दुसऱ्यांनी भरवावे, पांघरुण दुसऱ्यांनी घालावे. असा त्यांचा विक्षिप्त स्वभाव होता. कधी दिवसातून दोन वेळा आंघोळ तर कधी आठ दिवस ते आंघोळीविना राहत असत. ते स्वत:ची आरती करून घेत. उटी, व सुगंधी द्रव्ये लावून घेत होते. बाग, स्मशान, जंगल, झाडाखाली ते राहत होते, स्वत:शीच संवाद साधत असत. वेदमंत्र, श्लोक, भजन गात असत.

झाडे, दगड यांच्याशी मायेने ते बोलत असत, गोंजारत असत, असे वामनबुवा म्हणतात. तसेच भागवत म्हणून त्यांचे अनुग्रहीत होते. त्यांनी पण स्वामींचे असेच वर्णन केले आहे. केळकर म्हणून त्यांचे शिष्य म्हणतात, त्यांनी स्वामींना कधी झोपलेले पाहिले नाही, तोंडावर पांघरुण घेवून ते श्लोक म्हणत असत. त्यातच ते पहाटे वेदांत, भक्तीयोग, राजयोग, हटयोग यावर भक्तांचे शंका समाधान करीत असत. सूर्य उगवल्यानंतर मात्र प्रश्नांना उलट सुलट उत्तरे देत असत. अत्यंग उग्र व तापट पण कृपा असेल तर कनवाळू होते. छत्र चामर, फुले, पालखी असे वैभवात ते राहत असत. सर्व जाती-पातींच्या लोकांशी त्यांचे प्रेमाचे संबंध होते.

श्री स्वामी समर्थांचे एक शिष्य कर्वे म्हणून होते, त्यांनी त्यांना विचारले- आपण कुठून आलात? **मूळपुरुष, वडाचे झाड, दत्तनगर, मूळ** अशा गूढ शब्दात त्यांनी आपली ओळख करून दिली. एकदा स्वामी समर्थ म्हणाले, आमची जात चांभार, आई महारीण, बाप महार असे म्हणून ते खो खो करून हसत होते. श्री स्वामी समर्थांचे एक शिष्य नाना टेटवी म्हणून होते. त्यांनी स्वामींची पत्रिका केली. स्वामी म्हणाले, आम्ही यजुर्वेदी ब्राह्मण, नाव नृसिंह, गोत्र कश्यप, रास मीन, पुन्हा प्रश्न विचारशील तर टाळक्यात पायपोस घालीन असे चमत्कारिक उत्तर असे. पण स्वामींनी टेटवी यांनी केलेल्या पत्रिकेचे कौतुक केले. स्वामींचे लग्न मीन होते, रास मात्र मेष होती, असा उल्लेख आहे.

श्री स्वामी समर्थ यांची दीक्षा पद्धती ही संकल्प दीक्षा होती. पुढील काळात त्याचे स्वरूप शक्तिपात दीक्षा व अनुग्रह असे झाले. श्री स्वामी समर्थांनी अनेकांना दीक्षा दिली व त्यांची प्रगती केली. बाराव्या शतकात जशी संतपरंपरा होती, तशी स्वामी समर्थांच्या काळात गुरुपरंपरा होती. गजानन महाराज, शंकर महाराज, बिडकर महाराज, नारायण महाराज केडगावकर, जंगली महाराज असे अनेक महाराज गुरुपीठ म्हणून निर्माण झाले व सर्वसामान्य जनतेला त्यांनी मार्गदर्शन केले. खरेतर स्वामी समर्थांच्या अवताराचे हे महान कार्य आहे.

दत्त सांप्रदायात श्री प.पू. टेंबे स्वामींचे खूप महत्व आहे. दत्तावतार म्हणून त्यांचा उल्लेख केला जातो. टेंबे स्वामी प्रत्यक्ष दत्तात्रेयांशी बोलत असत. एकदा श्री स्वामी समर्थ हे टेंबे स्वामींच्या स्वप्नात गेले व म्हणाले, तुम्ही सर्वत्र फिरता काव्य करता अशावेळी आमचे वर अवकृपा का? म्हणून टेंबे स्वामी स्वप्नातून जागे झाले व दत्तात्रेयांना म्हणाले, हे कोण स्वामी आहेत. तुम्ही अक्कलकोटास यावे, अशी त्यांची इच्छा आहे. टेंबे स्वामी म्हणाले, ही जिव्हा दत्तात्रेयांना समर्पित केली आहे. इ.स. १९०४ मधील हा प्रसंग प.पू. टेंबे स्वामींच्या चरित्रात आला आहे. दोन सिद्ध पुरुषांचा, अधिकारी पुरुषांचा हा संवाद आहे. सामान्य व्यक्तींना त्यांचा अर्थ कळणे संभवनीय नाही. श्री स्वामी समर्थ हे पूर्ण ब्रह्म होते.

श्री स्वामी समर्थांचे शिष्य दिगंबर दास महाराज यांच्या कवनाने आपण या लेखाचा शेवट करु.

**अक्कलकोट स्वामी समर्थ ते थोर।**
**दत्त अवतार धन्य धन्य ।।८०।।**
**नृसिंह सरस्वती तेचि स्वामी राज।**
**संदेहाचे काज नाही नाही ।।८८।।**

**।। श्री स्वामी समर्थ जयजय स्वामी समर्थ।।**

■■■

# ।। विनम्र आवाहन ।।

गुरुतत्त्वाचा प्रचार व प्रसार आपणही करु शकता. हे मासिक अधिकाधिक भक्त व साधकवर्गापर्यंत पोहोचण्यासाठी आपणही ही सेवा करु शकता. आम्हाला आपल्या सेवेची नितांत गरज आहे.

- आपण 'गुरुतत्त्व' मासिकाचे सभासद होवून, इतरांनाही सभासद करावे.
- आपल्या फेसबुक अकाऊंटवरून 'गुरुतत्त्व' 'Gurutattvta' या फेसबुकवरील अकाऊंटशी संलग्न व्हावे. या अकाऊंटवरून दर महिन्याच्या अंकाची माहिती मिळेल, ती इतरांनाही द्यावी.
- आपल्या राहत्या परिसरातील ग्रंथालय, मंदिरे येथे मासिक सुरु करा.
- आपल्या दुकानामध्ये किंवा लोक संग्रहाच्या ठिकाणी २'×२' फुटाचे फ्लेक्सबोर्ड लावा. त्याबाबतीत आम्ही आपणास सहकार्य करु. त्यासाठी खालील मो. ९९२०९७९८८५ या क्रमांकावर संपर्क करावा.
- आपल्या विभागात मासिकाच्या सभासद नोंदणीसाठी वितरक व्हा. आपणास आम्ही मासिक पाठवू.
- शुभप्रसंगी 'गुरुतत्त्व' मासिक भेट म्हणून द्या.

यामुळे तुमच्या हातून सेवाही घडेल व सद्गुरुंचा प्रचार व प्रसार होईल व सेवेमध्ये वाढ होईल आणि आत्मिक समाधान मिळेल व 'गुरुतत्त्वा'चा प्रसारही होईल. संपर्कासाठी : **श्री संतोष श्यामराव जोशी - ९९२०९७९८८५** या क्रमांकावर आपल्याला सर्व सेवा प्राप्त होतील.

# श्री स्वामी समर्थांविषयी थोडेसे...

सौ. रागिणी उपासनी - ९८२००९५२३९

अक्कलकोट हे गाव मूळचे संस्थान होते. नंतर संस्थाने विलीनीकरणे झाली. परंतु गावात गेल्यावर संस्थानच्या काही खुणा आढळतात. किल्ला, बुरुज, वाडे इ. स्वामी समर्थांच्या पदस्पर्शाने पुनीत झालेली भूमी आता आध्यात्मिक पंढरी झाली आहे.

**'भिऊ नकोस, मी तुझ्या पाठीशी आहे.'** हे वचन वाचल्यानंतर आपल्यासमोर स्वामींची मूर्ती उभी राहते. भारतभर संचार केला आहे. इ.स. १८३७ च्या सुमारास महाराष्ट्रात प्रथम मंगळवेढ्यात प्रगट झाले. मंगळवेढ्यात १२ वर्षे वास्तव्य केले. कृष्ण भट, बयप्पा तेली, बाळकृष्ण बुवा, बाबाजी भट, एक शुद्ध दांपत्य, एक साळी, एक मुसलमान अशा थोड्या भाग्यवंताना चमत्कार दाखवून आपली ओळख पटवून दिली. श्री. स्वामी समर्थ म्हणजे ब्रह्मांडनायक दत्त अवतारातील (१) श्री दत्त, (२) श्रीपाद वल्लभ, (३) श्री नृसिंह सरस्वती, (४) श्री अक्कलकोट स्वामी म्हणजे श्री स्वामी समर्थ महाराज. त्यांच्याविषयही अधिक माहिती-

**(१) स्वामींची नावे** - श्री स्वामी समर्थ, चंचल भारती चैतन्य नृसिंह सरस्वती, दिगंबरबुवा, नृसिंहभान, श्री अक्कलकोट स्वामी महाराज.

**(२) स्वामींचा प्रकटदिन** - चैत्र शुद्ध द्वितीया, महानिर्वाण दिन - चैत्र वद्य त्रयोदशी शके १८०० मंगळवार दि. ३० एप्रिल १८७८ रोजी वटवृक्ष मठात.

**(३) आवडीच्या वस्तू** - भगव्या रंगाची फुले, बेसन लाडू, पुरण पोळी, कडबोळी, कांद्याची भजी.

**(४)** श्री स्वामींच्या पदस्पर्शाने पुनित झालेली स्थाने - अक्कलकोट, खासबाग, खंडोबाचे देऊळ, हाक्याचा मारुती शेख नरूद्दीन दर्गा.

**(५) अक्कलकोट येथील मठ** - वटवृक्ष स्वामी संस्थान मठ येथे स्वामी बसत. अनेक चमत्कार केले. येथेच महानिर्वाण झाले. **स्वामी समाधी मठ** प्रिय भक्त चोळप्पा यांच्या घरी स्वामींचा देह समाधिस्त केला आहे. बाळाप्पा महाराज मठ हे गुरुमंदिर म्हणून ओळखले जाते. बाळाप्पा महाराज यांची समाधी आहे. **जोशीबुवा मठ** - येथील मठात एका लाकडी पाटावर स्वामींचा पाय **(पादुका)** उमटलेला आहे.

स्वामी समर्थांच्या सहवासात ब्रह्मचैतन्य श्री गोंदवलेकर महाराज, नाशिकचे देव मामलेदार यांच्यासारखे उच्च प्रतीचे लोक, विष्णुदास बुवांसारखे विद्वान झाले. रामकृष्ण बुवा यांच्यासारखे उत्तम किर्तनकार झाले. काशीकर स्वामी किंवा आळंदीकर नृसिंह सरस्वती स्वामी यांच्यासारखे योगशास्त्रातले उंची गाठलेले लोक झाले. स्वामींकडे येणाऱ्या लोकांमध्ये सामान्य जनता आपले दुःख व समस्या घेऊन येत असत. त्यावर स्वामी त्यांच्याशी विचार विनिमय व सुसंवाद करून जनतेच्या समस्या सोडवत असत. ते नेहमी म्हणत असे की, जो कोणताही स्वार्थ हेतू मनात न ठेवता माझी सेवा, भक्ति करेल त्याला मी मदतच करीन. पण भाव शुद्ध व प्रामाणिक असावा. अपेक्षारहित भक्ति असावी. त्यांनी अनेक चमत्कार करून दाखवले.

कोरड्या विहिरीत पाणी आणले, लाकडी पाटावर पाऊले उमटविली, राम जोशीला गहन श्लोकाचा अर्थ सांगितला. वैष्णव भटाचा गर्व हरण करण्यासाठी जन्मांध मुलाकडून वेदमंत्र वदवून अनेकांना जीवदान दिले असे अनेक चमत्कार दाखवले. लोकांची भक्ति, निष्ठा वाढली. अनेक भक्त निर्माण झाले. त्यातील त्यांचा चोळप्पा हा पट्टशिष्य होता. त्याची खूपच निष्ठा स्वामींवर होती. त्यांची गुरुभक्ति श्रेष्ठ होती. याच पार्श्वभूमीवर स्वामी गुरूंचा महिमा सांगताना म्हणत असत-

"काशी क्षेत्रे निवसोऽ चं जान्हवी चरणोदकम् ।  
गुरुविश्वेश्वरः साक्षात्कारकं ब्रह्मं निश्चितम् ।।

गुरुचे घर किंवा गुरुगृही निवास हे काशी क्षेत्र गुरुचे चरणोदक म्हणजे गंगा. एवढेच नव्हे तर गुरु हा साक्षात विश्वेश्वर आणि सर्वतारक ब्रह्म होय हे प्रत्येक साधकाने निश्चयाने जाणावे. अशा पद्धतीने गुरुमहिमा सांगत असत.

स्वामींच्या चारित्रात महत्वाचे स्थान वटवृक्षाला दिले गेले. संत मंडळींनी नेहमीच निसर्गातील, सृष्टीतील वृक्ष-वेली यांना जवळ केले. त्याचे महत्व सांगितले. ज्ञानेश्वर, तुकाराम महाराज यांनीही महत्व पटवून

दिलेले आहे. श्री स्वामी समर्थांनीही वटवृक्षाचे महत्व सांगितले आहे. मीच वटवृक्ष, मूळ पुरुष. ते नेहमी वटवृक्षाखाली बसत. वटवृक्ष अखंडत्वाचे प्रतिक आहे, असे समजले जाते. शांत सावलीत बसणे त्यांना आवडत असे. अक्कलकोटला वास्तव्य असताना वटवृक्षाखाली भक्तांच्या इच्छा पूर्ण करून दिल्या. आजही आपल्याला हा वटवृक्ष दिसतो. अक्कलकोटातील वटवृखाखालील मठ असेच पावन झालेले आहेत.

स्वामीनिष्ठ भक्तांची मोठी परंपरा आहे. आज अनेक ठिकाणी मठ स्थापन झालेले आहेत. आपल्या भक्तांना त्यांनी नामस्मरणाचे महत्व पटवून दिले. त्यानेच आपला जन्मोद्धार होईल, हे सांगितले. भक्तिचा बाजार न मोडता मनाने समर्पण भावनेचे केलेले कार्य आपल्या जीवनाला तारून नेते, अशा प्रकारचा संदेश त्यांच्या बोधवाक्यातून दिसतो. नामस्मरणाच्या भांडवलावर आपण आध्यात्मिक संपत्ती खूप जमवू शकतो, हाच विचार प्रत्येक भक्तांजवळ असावा. येथे कोठेही बुवाबाजीचा लवलेश नाही. माणसाच्या अंतर्मनातील भावभावनांना एकत्रित आणण्याची शक्ति मिळते. 'मी'पणा, अहंकार सोडून दिला पाहिजे. स्वामी नेहमीच भक्तांना आवाहन करीत असत. ते म्हणत आमचे बोलण्यावर विश्वास ठेवा, राहिलेला काळ नामस्मरणात घालावा मोक्ष मिळेल. हेच त्यांच्या चरित्राचे सार आपल्या स्मरणात ठेऊन 'भिऊ नकोस, मी तुझ्या पाठिशी आहे' याचे स्मरण करते. श्री स्वामी समर्थांना कोटी कोटी नमस्कार!

■■■

# श्रावण मासातील सणांचे महत्व

श्रावण मासाबद्दल बालकवींची कवीता ही सार्थ ठरते. '**श्रावण मासी हर्ष मानसी, हिरवळ दाटे चोहीकडे, क्षणात येती सरसर शिरवे, क्षणात फिरुनि ऊन पडे**' याप्रमाणेच श्रावणात उत्साह ओसंडून वाहत असतो. शेतीला सुगीचे दिवस येतात, श्रावणधारांनी धरणीमाता ओलीचिंब झालेली असते. त्यामुळे सगळीकडेच उत्साहाचे वातावरण असते. शेतकरी आपल्या कामात मग्न असतो. उन्हाळ्यातील रखरखीतपणा जाऊन वातावरणात ओलावा व उत्साह येतो.

याच महिन्यातील पौर्णिमेच्या आसपास श्रवण नक्षत्र येत असल्याने या महिन्याला 'श्रावण' असो म्हणतात. या महिन्यापासून वर्षाऋतु सुरु होतो. या महिन्यातील प्रत्येक दिवशी कोणते ना कोणते तरी व्रत करावे असे शास्त्रात सांगितले आहे. त्यामुळे या महिन्याला अत्यंत पवित्र मानले जाते. हा महिना चातुर्मासात येत असल्याने ज्यांना चातुर्मासाचे संपूर्ण चार महिने नियम पाळणे शक्य होत नाही असे बहुसंख्य भाविक या महिन्यापुरते तरी नियम पाळतांना आढळतात.

उत्तर भारतात या महिन्यात झुलन यात्रा, रक्षाबंधन, श्रीकृष्ण जन्माष्टमी, नंदोत्सव वगैरे प्रमुख उत्सव साजरे करतात. तेथे पौर्णिमेच्या दिवशी राधा व श्रीकृष्ण यांना हिंदोळ्यावर बसवून झोके देतात. हा उत्सव एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत साजरा करतात. श्रीकृष्ण जन्माच्या दुसऱ्या दिवशी नंदोत्सव साजरा करतात. नंदाला या दिवशी पुत्र झाला या समजुतीने हा उत्सव केला जातो.

श्रावण महिना निसर्गदृष्ट्यासुद्धा आल्हाददायक असतो. सर्वत्र हिरवेगार वातावरण असते. अनेक फुलझाडांना बहर आलेला असतो व सुवासाने संपूर्ण वातावरण प्रसन्न झालेले असते. हे सर्व सृष्टीसौंदर्य पहायला व अनुभवायला शहरात न राहता खेडेगावात, रानात जाणे आवश्यक आहे. हल्ली हे सृष्टीसौंदर्य शहरातील लोकांना पाहण्यास मिळत नसल्याने शहरी लोक मुद्दाम वर्षा सहलींचे आयोजन करतात. ■■■

## सूचना

'**गुरुतत्त्व**' मासिकाच्या सभासद - वाचकांसाठी नवीन सदर सुरु करण्यात येत आहे. या सदरामध्ये **ज्योतिष, अध्यात्म व वास्तू** यासंबंधित आपल्या प्रश्नांची उत्तरे दिली जातील, यासाठी आपले प्रश्न लिहून संपादक, 'गुरुतत्त्व' कार्यालयात पाठवावीत.

**-संपादक**

'**गुरुतत्त्व**' मासिकाचा सप्टेंबर-२०१७ चा अंक **श्री वासुदेवानंद सरस्वती** यांच्यावर आधारित आहे. सर्व लेखकांना आवाहन आहे की, श्री वासुदेवानंद सरस्वती यांच्या कार्याविषयी माहितीपर लेख कार्यालयात पाठवावे. जागेच्या उपलब्धीनुसार त्यांचा समावेश अंकात करण्यात येईल. **-संपादक**

# श्री स्वामी उपासना आणि प्रभावी तोडगे

सौ. दिपनंदा दि. उपासनी - ९८२०५८०१६२

'जनीं सर्व सुखी असा कोण आहे' ह्या श्री समर्थ रामदास स्वामींच्या उक्तीप्रमाणे खरेच एकही माणूस 'मी सुखी आहे' असे म्हणणारा कुणीच सापडणार नाही. प्रत्येक व्यक्तीनुसार ही सुखाची व्याख्या बदलत जाते. माणूस कधीही सुखी समाधानी आहे, असे म्हणत नाही. सतत ऐहिक सुख मिळविण्यासाठी धडपड करीत असतो. सुखाच्या भ्रामक कल्पनेच्या मागे सतत धावत असतो व स्वतःला दुःखाच्या सागरात वाहून नेतो. कलीयुगात प्रेम श्रद्धा, नीतिमत्ता, अस्थिरता दिवसेंदिवस कमी होऊ लागली आहे. अशावेळी केवळ नामावर अढळश्रद्धा ठेवून नियमित नामस्मरण केले तर शांतीचा, सुखाचा व आनंदाचा ठेवा गवसेल.

प्रापंचिक माणसाला अनेक प्रसंगांना, संकटांना सामोरे जावे लागते, अशा मार्गातून पुढे जाताना हा मार्ग सुकर होण्यासाठी उपासनेचा, साधनेचा नक्कीच उपयोग होवू शकतो.

**''अनन्या चिंतयन्तो मां ये जनॉ पर्युपासते।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ।।**

सर्व समर्थ अशा मज परमेश्वराला जाणून जे केवळ माझेच चिंतन करीत अनन्यभावाने माझीच आराधना निष्कामतेने करतात, अशा माझ्याच ठिकाणी एकनिष्ठ असलेल्या त्या माझ्या भक्तांचा योगक्षेम मीच चालवितो. भक्तांची तो परमेश्वर काळजी घेतो. अनन्य भक्तांच्या जीवनाची काळजी संतापरी चित्तशक्तीच पाहणार नाही तर कोण पाहणार? हा अर्थ वरील श्लोकात सामावला आहे. श्री स्वामींनी सांगितलेच आहे, आपल्या भक्तांना अभय दिले आहे. ''भिऊ नकोस, मी तुझ्या पाठीशी आहे'' भिऊ नकोस असे श्री स्वामी कोणाला उद्देशून म्हणतात, याचा नीट्‌ विचार केला पाहिजे. स्वार्थासाठी चोरी करणाऱ्या चोराला, दरोडेखोरांना, स्वतःच्या सत्तेसाठी कोणत्याही थराला जाणाऱ्या व्यक्तींसाठी श्री स्वामींनी हे उद्‌गार काढलेले नाहीत. प्रामाणिकपणा व सत्यतेने प्रपंच चालविणाऱ्या सामान्य गृहस्थीजनांच्या मागे त्याला सर्वतोपरी मदत करण्यासाठी परमेश्वर त्याच्या पाठीशी उभा असतो. असा अर्थ नीटपणे समजून घेतला की, प्रामाणिक भक्तांच्या सांसारीक अडचणींमध्ये अशा व्यक्ती काही काळ अडचणीत असल्या तरी सहजपणे त्या मात करु शकतात. एवढेच नव्हे तर अशा अडचणींना आत्मविश्वासाने सामोरे जावू शकतात. का? तर श्री स्वामी भक्तीतून, उपासनेतून आत्मविश्वास वाढतो व आपण सहजपणे अडचणींवर मात करतो. परमेश्वर आपल्याला तारुन नेईल म्हणून हातपाय न हलविता बसून राहिलात तर मदतीला कोणीही येणार नाही. इच्छा असेल तर मार्ग मिळेल. तुम्ही प्रयत्न करा श्री स्वामी आहेतच.

साधनेत श्रद्धेला खूप महत्व आहे. तुम्ही मनापासून भक्ती करा, साधना करा प्रपंचाचा मार्ग सुकर झाल्याशिवाय राहणार नाही. तसेच श्री स्वामी समर्थांचा कृपाप्रसाद नक्कीच मिळेल, यात शंकाच नाही.

आपण काय करतो, कुणाचे नाम घेतो, किती घेतो, याचा ऊहापोह इतर जनात करु नये. तसेच उपासनेचा अहंकार होवू न देता नम्रतेने, शांततेने व अलिप्ततेने वागणे आवश्यक आहे. आळसात वेळ न दवडता कर्तव्यकर्म करून उद्योगी रहावे. भोग भोगूनच संपवावेत. दुःखातही संथपणे नाम घेऊन नामाचा वेग वाढवावा. त्यामुळे वेदनेची तीव्रता कमी-कमी होवून जीवन सुसह्य ठरेल व संकट कसे पसार झाले, याचा पत्ताही लागणार नाही. श्री स्वामींसारखे अवतारी गुरुदेव आजही ज्याच्या त्याच्या उपासनेप्रमाणे प्रत्यक्ष दर्शन, स्वप्न-दृष्टांत याद्वारे मार्गदर्शन करतात. त्यामुळे उपासकास मिळणारा आनंद अवर्णनीय व अथांग आहे. दररोज एक नित्याची ठराविक वेळ पक्की करून त्यावेळी मोजून होईल तेवढा, जमेल तसा (अगदी ३ माळा) नामजप करावा. नंतर येता-जाता वेळ मिळेल तेव्हा न मोजता अखंड नाम घेवून अनुसंधान साधावे. श्री स्वामींच्या इच्छेत आपली इच्छा मिसळून त्यांना भूषणावह होईल असे जगावे. अखंड नामाची संगत धरावी, दुसऱ्याची निंदा नालस्ती यात वेळ घालवू नये. साधू संत/गुरु यांच्या सान्निध्यात जास्त रममाण होवून सेवा साधल्यास अप्राप्य गोष्टी अनासायास साध्य होतात. त्यासाठी वेगळी साधना करावी लागत नाही.

नामावर विश्वास ठेवूनच ते घ्यावे. त्यामुळे श्रद्धा वाढेल नित्यकर्म करीत करीत नामाचे अनुसंधान साधून पुढे जावे. भ्रष्टाचार, फसवाफसवी यात न अडकता नितीने जगल्यास जीवनाचा खरा आत्मानंद गवसतो. अन्यथा राजवाड्यातही झोप येत नाही. श्री स्वामींवर अखंड श्रद्धा ठेवून, नियमित नाम घेवून त्यांना शरण जावे. गर्व न करता भजन पूजन, नामस्मरण यात यथायोग्य रमावे. कर्ताकरविता ईश्वरच आहे, याची खूणगाठ मनाशी ठेवून ते जसे ठेवतील, त्यातच आनंद मानायला शिकावे. श्री स्वामींना अनन्य शरण जावून त्यांच्या नामाचे अनुसंधान साधल्याने, त्या भक्तांना अभय प्राप्त झाले.

**''भिऊ नकोस, मी तुझ्या पाठीशी आहे.''**

भक्ती म्हणजे काय - तर भक्ती म्हणजे देवावर प्रेम करण्याची युक्ती. ही युक्ती साधण्यास प्रथम देवावर विश्वास ठेवणे आवश्यक आहे. देवावर विश्वास ठेवला की देव आहे, असा भाव दृढ होतो. नामातून भाव, भावातून निष्ठा व निष्ठेतून देवावरील प्रेम प्रगट होते. साधना करीत असतांना अनेक अडथळे येतात ते टाळावेत व सदाचाराचा अंगीकार करावा. सदाचार पाळावा.

**'जनी निंद्य ते सर्व सोडोनी द्यावे।**
**जनी वंद्य ते सर्व भावे करावे।।'**

श्री समर्थांच्या या उक्तीप्रमाणे शास्त्राने जे बरेवाईट सांगितले आहे, त्याचा विचार करावा. चांगल्याचा स्वीकार करावा व वाईटाचा त्याग करावा. जे करण्यास योग्य वाटते, ते श्रद्धेने करावे. श्रद्धा हे परमार्थाचे माहेरघर आहे. भगवंत म्हणतात-

'श्रद्धावान लभते ज्ञानं' ज्ञानप्राप्ती तर होतेच. पण त्या ज्ञानाने भगवंतांची म्हणजेच स्व-स्वरूपाची भेटही होते. हेच भक्तीतत्त्व. हे एकदा कळले की त्या मार्गाने वाटचाल करणे सोपे होते. श्री समर्थ म्हणतात, '**गमु पंथ आनंत या राघवाचा**' राघवाचा म्हणजे प्रभू रामरायाचा अर्थात तोच ब्रह्मप्राप्तीचा मार्ग. हा ब्रह्मप्राप्तीचा मार्गक्रमण करताना जीवाला सात अवस्थेतून जावे लागते. त्या अवस्था अशा आहेत. अज्ञान, आवरण, विक्षेप, परोक्ष ज्ञान, अपरोक्ष ज्ञान, तृप्ती, शोकापगम. आपला जीव परब्रह्माचा अंश आहे. परब्रह्मातून तो बाहेर पडला. त्याने दृष्य जगताचा आधार घेतला त्यामुळे तो स्वस्वरूपाला विसरला हेच अज्ञान! अज्ञानाच्या आवरणाने एक असता दुसरे भासते. जीवाची हीच भ्रमअवस्था आहे. हा भ्रम दूर करून जीवाने शब्दापलीकडील ज्ञानाचा विचार केला की, आत्मज्ञान होते. आत्मज्ञान झाले की, समाधान प्राप्त होते, दुःख नाश होते. दुःख नाश झाले की, जीवनात आनंदी-आनंद निर्माण होतो. साधकाचे मन आनंदी, समाधानी व तृप्त होते. साधकाने मनावर ताबा मिळविला की अशक्य गोष्टही श्री स्वामींच्या कृपेने शक्य होते. प्रपंच आणि परमार्थ हे दोन जीवनरूपी रथाची दोन चाक आहेत. जीवनाला सौंदर्य आणायला प्रपंचाबरोबर परमार्थाची नितांत आवश्यकता आहे.

श्री स्वामी समर्थ अखंड नामस्मरणाचा महिमा अगाध आहे. सतत श्री स्वामी समर्थ नाम मुखी घेतल्याने फलप्राप्ती 'इवलेसे रोप लावियेले दारी, तयाचा वेलू गेला गगनावरी' याप्रमाणे होते. नित्यनियमाने नामस्मरण करा. प्रार्थना करा. प्रार्थनेच्या वेळी प्रार्थना शब्दांच्या अर्थाप्रमाणे अनुभूती घेवून तशा विचारमग्न अवस्थेत एकाग्रतेने केल्यास श्री स्वामी समर्थकृपेने त्वरीत फलदायी होते. जर आपण अखंड श्री स्वामी समर्थ नामात दंग झाला, तेव्हाच (प्रत्येकाच्या नशिबी काही ना काही समस्या आहेत) ह्या समस्यारुपी अंधारातून बाहेर येण्यासाठी इतरत्र चाचपडत मार्ग शोधण्याऐवजी येणाऱ्या समस्यांना रोखू शकेल इतकी ताकद आपल्यात निर्माण व्हावी असे वाटते ना? म्हणून प्रत्येकाने स्वतःला भक्तीत लीन केले पाहिजे. फळ देण्यासाठी स्वामी आहेतच.

**''ध्यानी मनी स्वप्नी ।**
**जपे जो सदैव स्वामींसी।।**
**श्री स्वामी समर्थ उभे राहती ।**
**नित्य तयांच्या पाठीशी।।**
**स्वामी पाय जेथे जाती ।**
**तेथे ऐश्वर्य संपदा।।**
**स्वामींच्या नामस्मरणे ।**
**नष्ट होतात आपदा।।**

**विद्यार्थ्यांसाठी अत्यंत प्रभावी व उपयुक्त तोडगे**

१. दररोज न चुकता सकाळी स्नान झाले की, देवाला नमस्कार करावा. गणपतीचे स्मरण करून श्री गणपतीस्तोत्र किंवा एखादा श्लोक म्हणावा व 'श्री स्वामी समर्थ' या मंत्राचा १ वेळा मनातल्या मनात

जप करून आई-वडिलांना नमस्कार करून आपल्या नित्य कर्मास सुरुवात करावी.

२. सकाळी स्नान झाल्यावर सूर्यनारायणास नमस्कार करून अर्ध्य द्यावे व ११ वेळा 'ॐऱ्हीं सूर्याय नमः' या मंत्राचा जप करावा.

३. दररोज गणेश गायत्री मंत्राचा १ माळ जप केल्याने बुद्धी तल्लख होते 'ॐ एकदंताय विद्महे वक्रतुंडाय धीमही। तन्नो दंती प्रचोदयात।।

४. प्रत्येक विद्यार्थ्याने रात्री झोपण्यापूर्वी अर्धा तास आधी देवा पुढे बसावे. डोळे मिटून १० मिनिटे स्वामींचे ध्यान करून डोळे उघडावे व न समजलेल्या विषयाचे वाचन करावे व नंतर झोपी जावे. सकाळी उठल्यानंतर स्नान करून पुन्हा तोच विषय वाचावा. त्यामुळे अवघड विषय तुम्हाला सोपा वाटू लागेल.

निद्रावस्थेत विषय ग्रहण करण्याचा फार प्रभावी तोडगा आहे.

मग स्मरु या अखंड नामस्मरण 'श्री स्वामी समर्थ जय जय स्वामी समर्थ'

'श्री स्वामी समर्थ' या षडाक्षरी मंत्राचा अर्थही परिपूर्ण व लक्षात घेण्यासारखा आहे. 'श्री' म्हणजे वंदनीय, पूजनीय 'स्वामी' म्हणजे साक्षात् सद्‌गुरु महाराज व 'समर्थ' म्हणजे सर्व मनोकामना पूर्ण करणारे असा आहे. अशा स्वामींना माझ्याकडून सर्वाथाने साष्टांग नमस्कार असो.

**।। श्री स्वामी समर्थ ।।**

■■■

**वाचकांनी लेखांवरील आपल्या प्रतिक्रिया आमच्यापर्यंत अवश्य पोहोचवाव्या. -संपादक**

# बहुगुणकारी 'मध'

देवाच्या नैवेद्यात मान असलेल्या पंचामृतातील मध कोणाला आवडत नाही? नावाप्रमाणेच ते मधुर असते. यालाच मधु, शहद, माक्षिक अशी अनेक नावे आहेत. मध हे स्वतंत्र किंवा एकाच गुणाचे द्रव्य नसून भिन्न-भिन्न काळात, देशात निरनिराळ्या फुलांपासून मधमाशांद्वारे तयार होणारे द्रव्य आहे. शीत काळातील मध सर्वात उत्तम असतो. ग्रीष्म व वर्षाकाळातील संग्राह्य मध चांगला नसतो. मध हा अधिक काळपर्यंत टिकू शकतो. कारण मधमाशीच्या शरीरातील फॉर्मिक ॲसिड हे द्रव्य मधमाशी मधात मिसळत असते. मघ हा जितका जुना तितका अधिक चांगला.

**शुद्ध मधाची परीक्षा :**

१. मधामध्ये माशी पडल्यास ती निघून उडून जाते.

२. मधामध्ये कापूस बुडवून पेटवल्यास, काहीही आवाज न करता कापूस जळत राहतो.

३. मधाचा थेंब पाण्यात टाकल्यास तो पाण्या न मिसळता तळाशी बसतो.

४. मधाचा थेंब कपड्यावर पडल्यास तो थेंब कपड्याला न चिकटता घरंगळत जातो.

मधामध्ये डेक्ट्रीन व डी-फ्रुक्टोज हे पदार्थ असतात. त्यात Inverase, Amylase and Surase पाचक रस असतात. तसेच मधामध्ये 'ब' आणि 'क' जीवनसत्त्वे असतात. त्यात अल्प प्रमाणात हायड्रोजन पॅरॉक्साईड तसेच इनहिबीन हे पदार्थ असतात.

**मधाचे गुण :**

मध हा मधुर, कषाय (तुरट) रसात्मक असून तो रुक्ष व शीत गुणात्मक आहे. तसेच तो वर्ण्य (वर्ण सुधारणारे) व स्वर्य (स्वरासाठी उत्तम) आहे. तसेच तो योगवाही (Catalyst) देखील आहे. डेक्स्ट्रिन व डी-फुक्टोज या घटकांमुळे पचायला हलका आहे. कारण डेक्स्ट्रिन हा पदार्थ सरळ रक्तात मिसळत असतो. त्यात असलेल्या Inverase Amylase and Surcase या पदार्थामुळे मध हा सुकुमारताकारक, उल्लेखनीय व हृदयास हितकार असून अस्थिभग्न संधानाचे कार्य करणारा असतो. शरीरातील सूक्ष्मस्त्रोतसात प्रवेश करणारा असून लघु असल्याने कफनाशक आहे. मधुर कषाय असल्याने वातपित्तनाशक आहे. रुक्ष असल्याने शोधन व लेखनाचे कार्य करते. वणरोपक म्हणून दृष्टिमांद्य, डोळ्याचा जास्त नंबर असल्यास मधाचा उपयोग होतो. आयुर्वेदात म्हटलेच आहे- **'त्रिफळा मधुसर्पिभ्यां निशी नेत्रबलाय च।**

■■■

# तप सामर्थ्य

**ब्रह्मलीन प.पू. श्री. वासुदेव वामन बापट गुरूजी**

भारतीय अध्यात्मात देवऋण, पितृऋण, ऋषीऋण इत्यादी काही ऋण सांगितलेली आहेत. परंतु त्याशिवाय आणखी तीन प्रकारची ऋण प्रत्येक मानवावर असतात आणि ती संपूर्ण फेडल्याशिवाय त्याला मोक्षाचा मार्ग गवसू शकत नाही. ह्यातले पहिले म्हणजे सृष्टीचे किंवा निसर्गाचे ऋण, दुसरे समाजाचे ऋण आणि तिसरे देहाचे ऋण. आपल्या देहासकट ही सगळी ऋण आपल्यावर आहेत. हे एकदा मान्य केल्यानंतर त्याच्या निष्कृतीचे उपायसुद्धा आपल्याला बघितले पाहिजेत. भगवद्गीतेमध्ये श्रीकृष्णाने अर्जुनाला हे उपाय सांगितले आहेत. त्यामध्ये सृष्टीच्या ऋणांकरिता यज्ञ सांगितला आहे, समाजाच्या ऋणांसाठी दानाचा मार्ग सांगितला आहे आणि देहाचे ऋण फेडण्याकरिता जो उपाय सांगितला आहे, तो म्हणजे तप.

ऋणमुक्तीच्या ह्या तीन मार्गापैकी पहिल्या दोन मार्गांचा काही प्रमाणात मर्यादा येतात. कारण आपण रोज काही यज्ञ, दान किंवा सन्मान आयोजित करू शकत नाही. मात्र तप आपल्या मनाला जेव्हा वाटेल तेव्हा करू शकतो. केवळ देहच नव्हे, तर ज्याद्वारे समाजाचेही ऋण फेडता येतात, त्या तपाचरणाचे महत्व तर भारतीय तत्त्वज्ञानाने उच्चरवाने सांगितले आहे. म्हणूनच ऋणमुक्तीच्या ह्या श्रेष्ठ मार्गाचा सांगोपांग विचार आवश्यक ठरतो.

**मानवी देह : तपाचरणाचे श्रेष्ठ साधन**

प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानाने जीवनाचरणाचे जे दोन मार्ग सांगितले आहेत, ते म्हणजे प्रेयम आणि श्रेयस. प्रेय मार्गाची उत्पत्ती देहबुद्धीतूनच होते, हे तर सर्वज्ञात आहे; पण श्रेयस मार्गासाठीसुद्धा देहाची आवश्यकता असते. कारण आपण तपसुद्धा देहाच्या सहाय्यानेच करू शकतो. तप करण्यासाठी स्वर्गलोकातल्या देव-देवतांनाही देह धारण करून मर्त्यलोकात जन्म घ्यावा लागतो, असे म्हटले जाते. तप करणे किंवा सत्कर्म करणे, हाच वस्तुतः मानवी देहाचा प्रमुख उपयोग आहे. परंतु आपण समाजात बघत असतो, की हा मुख्य उद्देश सोडून इतर अनेक कर्मांसाठी देहाचा दुरुपयोग केला जात असतो. मनुष्याचा स्वभावच असा आहे की, त्याला विषयावर प्रेम करायला शिकवावे लागत नाही. सुख लालसेच्या उपजत प्रेरणेबरोबर ते ज्ञान त्याच्याकडे आपोआप आलेले असते. विषयाची अभिलाषा असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला आणि पर्यायाने संपूर्ण समाजाला इंद्रियांच्या माध्यमातून सुख मिळवण्याची ओढ लागलेली असते. परमार्थाचे सुख मात्र कुठल्याही इंद्रियांच्या माध्यमातून मिळत नाही! देहाच्या माध्यमातून जरी ते मिळालेले असले, तरी हे सुख इंद्रियनिरपेक्ष किंवा इंद्रियातीत असते.

**तपाची व्याख्या**

दुर्दैवाने मनुष्याला परमार्थाची आवड मात्र उपजत नसते. ती त्याला जोपासावी लागते, अभ्यासाने वाढवावी लागते. प्रयत्नपूर्वक परमार्थाची आवड वाढवायचा प्रयत्न करणे म्हणजे तप करणे, ही तपाची सोपी व्याख्या आहे. माणसाच्या मनामध्ये सतत द्वंद्व चालू असते. मनुष्य जेव्हा इंद्रिय सुखाच्या पलिकडे जाऊन पारमार्थिक सुख मिळविण्यासाठी काही विशिष्ट प्रयत्न करत असतो, तेव्हा हे द्वंद्व तेवढ्या काळापुरते तो सहन करतो. यालाच तप करणे म्हणतात. सारांशाने तप करणे म्हणजे सतत द्वंद्व सहन करणे. ही सबंध सृष्टी द्वंद्वात्मक आहे, इथे सगळीकडे द्वैत भरलेले आहे. जसे शीत आहे, तसे उष्ण आहे. सुख आहे तसे दुःखही आहे. या द्वंद्वाचा अनुभव सर्वांना कधी ना कधीतरी आलेला असतो. हे सर्व द्वंद्व जो आनंदाने सहन करतो, त्याला तप साधले असे म्हणायला हरकत नाही.

मुळात ह्या द्वंद्वाची उत्पत्ती नेहमी तुलनेतून होत असते. एक साधे उदाहरण घेऊया. तान्ह्या बाळाला साखरेची चव माहीत नसते, तोपर्यंत जे काही दुध तुम्ही त्याला द्याल, ते ते मुकाट पीत असते. पण ज्या दिवशी त्याच्या दुधात साखर घालून त्याला दिली जाते, त्या दिवसानंतर साखरेशिवाय दूध ते बाळ तोंडातही घेत नाही. त्याला कारण इथे काल दूध छान होते, आजचे

काही बरोबर लागत नाहीये' अशी सुखदुःखाची तुलना त्याच्या मनात निर्माण झालेली असते. ह्या दृष्टीने, अशा कोणत्याही तुलनेच्या अतीत होणे, त्याच्या पलिकडे जाणे, म्हणजे तप करणे ही तपाची तिसरी व्याख्या होते. थोडक्यात म्हणजे आपल्या आयुष्यामध्ये कितीही द्वंद्व निर्माण झाली, तरी नको असलेल्या पण अपरिहार्यतेने आपल्यावर येणाऱ्या, कोसळणाऱ्या किंवा आदळणाऱ्या अनाहूत गोष्टींना अलिप्ततेने सामोरे कसे जायचे, ह्याचा विचार करणे आणि तशा प्रकारची कृती करणे म्हणजे तप करणे.

**तप : शक्तीचे पुनरुज्जीवन**

वैज्ञानिक परिभाषेत तपाच्या व्याख्येचा आणखीही विस्तार करता येतो. ह्या द्वंद्वात्मक विश्वात जीवन जगत असताना मनुष्याचा अखंड शक्तिव्यय चाललेला असतो. नको त्या गोष्टींकरिता होणारा हा शक्तिव्यय थांबवून शक्तीचे पुनरुज्जीवन करणे, म्हणजे तप करणे अशी सुद्धा तपाची व्याख्या करता येते.

भारतीय अध्यात्मात अशा प्रकारच्या शक्तीच्या पुनरुज्जीवनाची अनेक उदाहरणे आहेत. रावण, विश्वामित्र ऋषी, भक्त अचूक पुनरुज्जीवन केले. शक्तीचे पुनरुज्जीवन करण्याच्या प्रक्रियेचा मुख्य गाभा म्हणजे इंद्रिय दुःखाच्या ओढीवर नियंत्रण प्राप्त करणे. इद्रियजन्य प्रत्येक सुख उपभोगताना तिथे मोठ्या प्रमाणावर शक्तिव्यय होत असतो. ज्यामुळे जन्मतः मनुष्य जी शक्तिपुंजी बरोबर घेऊन आलेला असतो, ती शक्ती अनाठायी खर्ची पडत असते. भोगांसाठी शक्तीचा व्यय थांबवणे आणि नव्याने शक्तीचे पुनरुज्जीवन करणे, म्हणजे अधिक शक्ती मिळविण्यासाठी स्वेच्छेने दुःख स्वीकार करणे, ह्यालाच तप करणे म्हणतात.

कुठल्याही तपामध्ये दुःखाचा स्वीकार जर होत नसेल, तर ते तप म्हणता येत नाही! शब्दकोषानुसार तप ह्या शब्दाचा अर्थ आहे, तप्त, ताप, गरम होणे किंवा यातना सोसणे. निसर्ग नियमांप्रमाणे हा ताप प्रत्येकाला कोणत्या ना कोणत्या तरी वेळी अनाहूतपणे येतोच येतो. शारीरिक आणि मानसिक अशा दोन्ही दृष्टिकोनातून तो टाळता येत नाही. मग त्या प्रत्येक वेळेला मनुष्याकडून तप घडलेले असते का? तर नाही! कारण त्या वेळेला त्याने तो त्रास नाईलाजाने सहन केलेला असतो. पण जेव्हा निसर्गाने तुमच्यावर काहीही लादलेले नसते आणि तरीसुद्धा तुम्ही ताप सहन करता, तेव्हाच ते ताप होते.

**तप : त्यागवृत्तीची जोपासना**

योगी अरविंदांनी तपाची जी व्याख्या केली आहे, त्याप्रमाणे 'इदं न मम' असे म्हणत दैहिक सुखांचा त्याग सत्कर्मासाठी करणे, हे एक श्रेष्ठ तप आहे. वेदांचा पुरस्कार करणाऱ्या दैहिक सुखांचा त्याग सत्कर्मासाठी करणे, हे एक श्रेष्ठ तप आहे. वेदांचा पुरस्कार करणाऱ्या योगी अरविंदांच्या मतानुसार अशा प्रकारच्या त्यागवृत्तीसहित सद्हेतूपूर्वक प्रज्ज्वलित केलेल्या अग्नीसमोर मंत्रपठण करणे, हेसुद्धा फार मोठे तप आहे. आपल्याकडे याज्ञवल्क्य संहिता किंवा तैत्तिरीय संहिता याच्यामध्येही सांगितले गेले आहे, की सद्हेतूपूर्वक निर्माण केलेल्या गतीसमोर नव्याने आणखी उत्कृष्ट गती निर्माण करणे, म्हणजे यज्ञ करणे आणि पर्यायाने तप करणे होय.

तप ह्या प्रकारात आपल्याकडे लक्ष्मीप्राप्ती किंवा सोळा सोमवार अशा अनेक प्रकारची व्रतवैकल्येसुद्धा सांगितली आहेत. परंतु भौतिक जगातल्या विविध मागण्यांसाठी केल्या जाणाऱ्या उपास-तापास किंवा इतर व्रतांना खऱ्या अर्थाने तप असे म्हणता येत नाही. कारण तिथे शाश्वत सुखाची मागणी करण्याऐवजी अशाश्वततेची, न टिकणाऱ्या सुखाची मागणी केलेली असते. 'मला आलेले दुःख तू ताबडतोब घालव' एवढी एकच मागणी त्याच्यात केलेली असते. ते तप नव्हेच! पुराणात बऱ्याच अर्थार्थी भक्तांनी फळाची अपेक्षा ठेवून तप केले, पण पुढे तपाच्या शेवटी ज्ञानप्राप्ती झाल्यामुळे त्यांच्या सर्व अपेक्षा लयाला गेलेल्या आढळतात. ह्याचे सगळ्यात मोठे उदाहरण म्हणजे ध्रुवबाळ. ध्रुवाने अडळपदाच्या प्राप्तीसाठी तप केले. परंतु तपाच्या शेवटी त्याला त्याच्या मागणीतला फोलपणा लक्षात आला आणि त्याने ते अढळपदही नाकारले.

**तपाचे प्रकार**

तपाच्या या सर्व व्याख्यांमधला एक सारांशात्मक अर्थ असा की, सततच्या भोगांमुळे मनुष्याचा जो शक्तिव्यय होत असतो, ती शक्ती स्वेच्छेने केलेल्या तपाद्वारे आपण भरून काढू शकतो. म्हणून प्रज्ञावान, ज्ञानी, हुशार मनुष्य हा निसर्गाकडून तडाखा मिळण्याच्या अगोदरच तप सुरू करतो. आगाऊ स्वरूपात दुःखाचा स्वीकार करण्याचा निर्णय जो ज्ञानपूर्वक घेतो, त्याचा भविष्यकाळ उज्ज्वल ठरतो. असा निर्णय घेणाऱ्या साधकासाठी तपाचे मुख्य तीन मार्ग अध्यात्माने सांगितले आहेत; शारीरिक तप, वाचिक तप आणि मानसिक तप.

ह्यातल्या पहिल्या प्रकारच्या म्हणजे शारीरिक तपामध्ये गुरुपूजन, द्विजपूजन, देवपूजन यांचा अंतर्भाव आहे. निष्कपटता, अहिंसा ह्या गुणांचे अनुसरण म्हणजे शारीरिक तप असते. वाचिक तप म्हणजे सतत प्रिय भाषण करणे, अपशब्द तोंडातून न बाहेर पडू देणे, दुसऱ्याला बोचणाऱ्या शब्दांचा कमीतकमी वापर करणे. ह्याला वाङ्मयीन तप असेही म्हणतात. उत्तम बोलणे, नामस्मरण, निरनिराळ्या प्रकारचे मंत्र, स्तोत्र, ऋचा यांचे सतत स्मरण, हेसुद्धा वाङ्मयीन तप आहे. आपणही नामस्मरण करत असतो, पण 'नारायण नारायण' म्हणताना त्या नारायणाचे मनापासून चिंतन होताना आढळत नाही, त्यामुळे तेवढ्या प्रमाणात ते तपही घडत नाही! याउलट मानसिक तप म्हणजे सतत मनाची प्रसन्नता ठेवणे, शांत भाव ठेवणे, भगवद् चिंतन करणे आणि मनाचा निग्रह करून अंत:करणाचे पावित्र्य राखणे. खरंतर ही तप स्वतंत्र आहेत, असे म्हणता येत नाही, कारण कुठल्याही एका तपामध्ये दुसरी दोन्ही तप सूक्ष्म रुपाने समाविष्ट झालेली असतात.

मुळात कोणत्याही प्रकारचे तप करण्यासाठी मनाचा निश्चय आवश्यक असतो. मनाचा निश्चय असेल तर वाटेल ते घडू शकते! मनाच्या तीव्र निश्चयालाच अध्यात्मामध्ये संकल्प असे म्हणतात. तप किंवा शक्तीचे पुनरुज्जीवन करण्याची ही प्रक्रिया इतकी विलक्षण आहे की, त्यामुळे सामान्य परिभाषेत चमत्कार म्हणता येईल, इतका बदलसुद्धा घडू शकतो.

सात्त्विक तप, राजस तप आणि तामस तप असे हेतुनुसार तपाचे अजून तीन विभाग भगवद्गीतेने केलेले आहेत. राजस तपामध्ये मानसन्मान, सत्कार, दंभ, मोठेपणा इ. कारणांसाठी केलेल्या तपाचा समावेश आहे. ह्या तपामुळे धनाची श्रीमंती, मान-सन्मान प्राप्त होतो खरा, पण तुमचे तपाचे सामर्थ्य संपले की, ते सगळे निघून जाते. याचा अर्थ तुम्हाला काही न मागता तपाचे फळ मिळाले, तर ते नाकारावे का? तर तो तुमचा व्यक्तिगत प्रश्न आहे. तुम्ही अलिप्त राहून जर तो फलभोग घेऊ शकत असाल, तर जरूर स्वीकार करा नाहीतर नाकारायलाही काही हरकत नाही. तपाचे उच्चारण मान-सन्मान मिळविण्याच्या हेतूने कधीही करू नये, असा अध्यात्मात संकेत आहे. कारण जेवढ्या प्रमाणात तपाची पुन:रुक्ती आपण करीत राहू, तेवढे तेवढे त्या तपाचे, त्या पुण्यकर्माचे सामर्थ्य कमी होत जाते. ज्या तपामध्ये स्वत:ला आणि इतरांनाही यातना देण्याचा समावेश होतो, त्याला तामस तप म्हणतात. रावण, सुंद-उपसुंद, ह्या काही राक्षसांच्या तामसिक तपाच्या गोष्टी प्रसिद्ध आहेत. हे सगळे तामस तप आहे, कारण मुळात इच्छाच दुसऱ्याचे वाईट करण्याची होती. अशा प्रकारचे तप हे भगवद्गीतेला मान्य नाही आणि आपल्या प्राचीन ग्रंथांनाही मान्य नाही. हे दोन्ही प्रकार टाळून इतर कोणतीही अपेक्षा न ठेवता शाश्वत सुखाच्या प्राप्तीसाठी केलेले तप हे सात्त्विक तप असते.

मग प्रश्न असा उद्भवतो की, फक्त सात्त्विक तपातूनच शक्तीनिर्मिती होते का? तर नाही. कुठल्याही प्रकारच्या तपातून, मग ते राजस असो, तामस असो किंवा सात्त्विक असो, त्याच्यातून शक्ती निर्माण ही होणारच. पण त्या शक्तीचा उपयोग आपण कशाकरिता करतो, हे महत्त्वाचे असते.

मैत्र्योपनिषद आणि मनुस्मृती ह्यामध्ये तपापासून काय काय प्राप्त होऊ शकते, ह्याचा उल्लेख आहे. मनु असे म्हणतो की, तपाने सर्व सुखं मिळतील. बरोबर आहे, त्याच्यात अतिशयोक्ती काहीच नाही. विश्वातल्या सर्व गोष्टी तपाने प्राप्त होतात, हे समीकरण एकदम बरोबर. पण ते तप कशा पद्धतीने केले गेले, त्यालासुद्धा महत्त्व आहे. विश्वामित्राने केलेल्या तपाची गणनासुद्धा राजस तपामध्ये झाली, कारण हेतू एकच होता, 'मला ब्रह्मर्षी म्हटले जावे! त्या तपामुळे तो जरी प्रतिसृष्टी निर्माण करू शकला, तरी ब्रह्मर्षी असे कोणी त्याला म्हटले नाही. आत्मशोधनानंतर आपली चूक जेव्हा त्याला समजली, त्यावेळेला त्याने वसिष्ठांचे ब्रह्मर्षीपद मान्य केले. आत्मशोधनांती त्याच्या झालेल्या परिवर्तनानंतर वसिष्ठांनीही त्याला ब्रह्मर्षी पद मोठ्या सन्मानाने दिले. थोडक्यात राजस तपाची परिणती जेव्हा सात्त्विक तपामध्ये झाली, तेव्हाच तो ब्रह्मर्षी पदाला आपोआप पोहोचला आणि त्यानंतर गायत्री मंत्रासारख्या श्रेष्ठ मंत्राची निर्मिती त्याच्या हातून घडली.

तात्पर्य एवढेच की, तपामुळे मिळणाऱ्या तात्पुरत्या भौतिक सुखासाठी साधकाने तप करु नये. तपातून जी काही शुद्धी होते, त्यातून सामर्थ्य निश्चितपणे मिळते, पण ते सामर्थ्य तात्पुरत्या सुखासाठी न वापरता शाश्वत सुखासाठी जो वापरतो, त्यालाच तपस्वी म्हणवून घेण्याचा अधिकार प्राप्त होतो. कोणतेही तप हे ज्ञानतप असले पाहिजे. हे तप मी कशाकरता करतोय आणि त्याच्यातून

मला काय प्राप्त होणार आहे, हे ज्ञान अतिशय आवश्यक आहे. तात्पुरत्या सुखाला नकार देण्याचे सामर्थ्य असेल, त्याच्या मागच्या ज्ञानाचे चिंतन झाले असेल तरच ते सगळे तप आपल्या हातून निश्चितपणे घडते.

**तपाची त्रिसूत्री**

ह्या सगळ्याचा विचार करून आणि अलिकडच्या काळाला अनुसरून जर तपाची त्रिसूत्री सुटसुटीतपणे मांडायची झाली, तर सत्कर्म, प्रचार आणि नकार - अशी त्रिसूत्री आपल्याला मांडता येईल.

सत्कर्म करताना त्याचा प्रचार केला, तर त्याहूनही भक्ताचे तप घडत असते. पण विशिष्ट गोष्ट प्राप्त होण्यासाठी किंवा एखादी व्यक्ती वश होण्यासाठी जर आपण तो प्रचार करीत असू, तर तो खरा प्रचार होत नाही. आपल्याला पटलेल्या गोष्टीचा प्रचार केल्यामुळे २-३ हेतू साध्य होतात. पहिला हेतू म्हणजे आपल्याला पुन:प्रत्ययाचा आनंद मिळतो. आपला उत्तम अनुभव जेव्हा आपण दुसऱ्याला सांगत असतो, तेव्हा आपल्यालाही आतून आनंद होतो. प्रचारातून आणखी एक गोष्ट साध्य होते. ती म्हणजे त्या ज्ञानाचे पचन करण्याच्या दृष्टिकोनातून जी उजळणी आवश्यक असते, ती आपोआप होते.

तिसरे म्हणजे प्रचारामध्ये विचारांची देवाणघेवाण होते. ह्या सगळ्या प्रक्रियेत निसर्ग आपली परीक्षा घेत असतो. एखादा मनुष्य आपले सगळे म्हणणे नाकारतो की, 'मला हे काही मान्य नाही.' इथेच तुमची परीक्षा असते की, तुमची निष्ठा किती आहे, तपाचे सामर्थ्य तुम्हाला किती पटले आहे, तुमचे ज्ञान किती आहे आणि तुम्ही ते कशा प्रकारे लोकांपर्यंत पोहोचवू शकता. त्या परीक्षेत जर पास झालात, तर निश्चितपणे तुमच्या हातून उत्तम तप घडते. याउलट एखाद्याच्या नकारामुळे जर तुमची स्थिती विषण्ण झाली, जर तुम्ही त्या परीक्षेत नापास झालात असे समजा.

आध्यात्मिक जीवन जगणाऱ्या प्रत्येक साधकाला सत्कर्माचा प्रचार करता आला पाहिजे. समाजातला जो जो घटक तुमच्यापर्यंत येईल, त्याच्यापर्यंत हे ज्ञान पोहोचवता आले पाहिजे. प्रचारामुळे घडलेल्या ह्या तपाबरोबरच मानमरातब, भौतिक इच्छापूर्ती अशांसारख्या आपल्या क्षुद्र स्वार्थालाही नकार देता आले पाहिजे. खरंतर असा नकार देणे हेसुद्धा एक प्रकारे तपच आहे.

**तपाच्या अटी**

काहीवेळा मनुष्याच्या जीवनात तपाच्या संधी अगदी अनाहूतपणे येत असतात. त्यातली पहिली संधी म्हणजे अचानक उद्भवणारी व्याधी. ही तपाची अनाहूतपणे चालून आलेली संधी असते. आलेली व्याधी न कंटाळता भोगण्यामुळे तप घडत असते. याचा अर्थ व्याधीवर औषधोपचार करू नये असा नाही. त्यावर आवश्यक औषधयोजना जरूर करावी. पण तरीसुद्धा त्या व्याधीमुळे ज्या काही वेदना भोगाव्या लागतात, त्या आनंदाने सहन करणे हा तपाचाच भाग आहे, किंबहुना ती तपाची प्रमुख अट आहे. समर्थांनी म्हटले आहे-

**'देहे दु:ख ते सुख मानीत जावे।**
**विवेके सदा स्वरूपी भरावे.'।।**

सुखासीन जीवनाचा त्याग किंवा त्या सुखापासूनची अलिप्तता आपल्याला साधता आली, तर तेसुद्धा एक मोठे तप आहे. 'मला अमुक एका सुखाची लालसा नको' किंवा 'ते मिळवण्यासाठी मी प्रचंड ओढाताण करणार नाही' असा निश्चय करणेही खरेतर तपाची पूर्वअट आहे. अशा तपातून आपल्याला रोजच्या जीवनातही काही प्राप्ती आपोआप होत असते. उदाहरणार्थ जीभेला आवडणारा, पण शरीराला अयोग्य असलेला आहार न घेण्याचा तप स्वीकारला, तर आपल्याला आरोग्याचे सुख मिळू शकते. आणि एवढे करूननही समजा अनारोग्य आले तरी तेही तप म्हणून आपल्याला स्वीकारता आले पाहिजे!

अहंकाराचा त्याग ही तपाची पुढची अट आहे. मनुष्याला सतत 'मी' स्फुरत असतो. मी १२ वर्ष गुरुचरित्राचा सप्ताह करतो, असे जो दुसऱ्याला सांगतो, त्याचा अहंकार एवढा वाढलेला असतो, की त्या अहंकारामुळे त्याच्या त्या तपाचे आध्यात्मिक फळ नष्ट झालेले असते. 'मी अमुक दान केले' हे उच्चारवाने जो सांगतो, त्याचे दानाचे पुण्य नष्ट झालेले असते. याचाच अर्थ असा की, कोणत्याही भौतिक किंवा आध्यात्मिक क्रियेचे नाते जेव्हा तपाशी जोडले गेलेले नसते, तेव्हा ती क्रिया फुकट गेलेली असते आणि ती अंतिमत: मनुष्याला क्लेशकारक होते. ज्याला तपाचे योग्य ज्ञान झालेले असते, त्याला हे क्लेश होत नाहीत. रमणमहर्षी हे फार उच्च दर्जाचे संत पुरुष. त्यांना एकदा काखेमध्ये मोठी गाठ आली आणि त्यातून पाणी वाहायला लागले. त्यांचे शिष्य सांगायचे की तुमच्या जखमेतून पाणी येते,

कपडे भरलेत तुमचे. तर त्यांनी शेवटी सांगून टाकले, 'जाऊ दे ना, त्या गाठीला काय करायचेय ते करू दे. मला काय करायचेय ते मी करतोय!'' म्हणजे इतक्या आनंदाने त्यांनी त्या व्याधीचा स्वीकार केला आणि शिवाय तिथे अहंकाराचाही त्याग केला. 'मी केवढे मोठे दु:ख सहन करतोय', ह्याचाही कुठे आव आणला नाही. तपासाठी स्वार्थावरचा हा संयम सर्वात महत्त्वाचा आहे. तिथे अहंकाराने सत्कर्माचे परत-परत उच्चारण असू नये. धनाचे उच्चारण नको, मानाचे, सन्मानाचे, कीर्तीचे कशाचेही उच्चारण नको. तपाची पुढची अट म्हणजे एकाग्रता नसेल तर तपाचे योग्य ते माप आपल्या खिशात पडत नाही. ही एकाग्रता होण्यासाठी मन आणि इंद्रिय यांचे बरोबर मनोमिलन व्हावे लागते. हे मनोमिलन होणे हेच मुळात एक मोठे तप आहे. मन आणि इंद्रिय जेव्हा एकाच रस्त्यावरून हातात हात घालून जातात, तेव्हा ते तप बरोबर घडलेले असते.

बऱ्याच लोकांना तप करताना काही सवयी असतात. त्यांची पूर्तता झाली, तरच त्यांच्याकडून तप घडले. खऱ्या तपामध्ये अशा कुठल्याही सवयींची जरूरी नसते, कुठल्याही सुखसोयींची आवश्यकता नसते. अशी जर सवय आपण स्वत:ला लावलेली असेल, तर ती काढून टाकायला पाहिजे. 'मला विष्णुमूर्ती समोर असल्याशिवाय माझी एकाग्रता होत नाही' असे म्हणणारा मनुष्य त्या महाविष्णूवरच अन्याय करत असतो, कारण विश्वरचनेशी संबंधित अशा ब्रह्माकार शक्तिपासून त्याने विलगता घेतलेली असते. संपूर्ण विश्वात जे ब्रह्मतत्त्व भरलेले आहे, त्याच्या प्राप्तीसाठी आपल्याला तप करायचे आहे. त्यासाठी विशिष्ट प्रतिमा, विशिष्ट मूर्ती, विशिष्ट पूजा साहित्य, विशिष्ट आचार साहित्य, कशाचीही आवश्यकता नाही. ईश्वराचा आशीर्वाद सद्गुरूरूपाने आपल्याला मिळाला की, आपले तप सुरू झाले म्हणून समजा. तेवढी निष्ठा त्या तपावर आणि आपल्या साधनावर पाहिजे तरच ते तप घडते, नाहीतर तप घडत नाही. असे तप एकाग्रतेशिवाय घडत नसते आणि ही एकाग्रताच आपल्याला आपले इच्छित ध्येय साध्य करून देते. एकनाथी भागवतात म्हटले आहे,

**जाणवया निजात्म स्वरूप । देहादी विषयांचा अनुताप ।**
**जेणे साधक होती निष्पाप । या नाव तप ।।**

इतकी सोपी व्याख्या एकनाथ महाराजांनी केलेली आहे! तप म्हणजे फार मोठे गौडबंगाल आहे, असे नाही. त्यासाठी ध्रुव बाळासारखे जंगलात जाण्याचीही जरुरी नाही. रोजच्या जीवनात येणारे अनुताप आनंदाने सहन केलेत आणि सद्गुरुंच्या आज्ञेनुसार जीवन व्यतीत केलेत, तरी तप घडेल असे एकनाथ महाराज म्हणतात. सद्गुरुतत्त्वाच्या आशीर्वादाने कशाप्रकारे लवकर तप घडते, ह्याविषयी प.पू. श्रीमद् वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांच्या चरित्रामध्ये एक छोटीशी गोष्ट आहे.

पहिल्या चातुर्मासानंतर स्वामी महाराज काशीयात्रेला निघाले होते. काशीचा मार्ग फार खडतर होता. रस्ता सबंध जंगलातून होता आणि श्वापदांची भीती होती. जालवणापासून काशीपर्यंत नुकतीच रेल्वे सुरू झाली होती. त्यामुळे बरोबरची शिष्य मंडळी महाराजांना म्हणाली की, 'रेल्वे सुरु झालीये, तेव्हा आपण रेल्वेने जाऊया.' संन्याशाने वाहनात बसू नये असा नियम असल्याने महाराज म्हणाले, 'मी पायी जाणार. ईश्वराच्या मनात जसे असेल तसे घडेल' आणि त्यांनी पायवाटेने प्रवास सुरू केला. वाटेत घोर अरण्य लागले, तरीही त्यांनी नामस्मरण करीत आपला मार्ग चालू ठेवला. हे विश्वशक्तीशी एकरूप झालेले, तेव्हा त्यांना कसली भीती? पण त्या ईश्वराला त्यांची काळजी होती! वाटेत त्यांना एक भिल्ल भेटला आणि त्यांना म्हणाला, 'स्वामी महाराज, काशी इथून फार दूर आहे. कमीतकमी ४-५ दिवस तरी तुम्हाला हे अरण्य तुडवून जावे लागेल. शिवाय वाटेत जंगली श्वापदे पण खूप आहेत. तुम्ही असे करा, माझ्या मागून या. मी तुम्हाला अगदी जवळची वाट दाखवतो.'' एवढे म्हणून तो भिल्ल पुढे चालू लागला. भिल्ल पुढे आणि स्वामी महाराज मागे असे ते दोघे जंगलामध्ये चालू लागले. दोन-तीन तास त्या भिल्लाबरोबर एक टेकडी उतरून ते खाली आले. तिथून समोर दिसणाऱ्या गावाकडे त्या भिल्लाने बोट दाखले आणि म्हणाला, 'त्या गावातून काशीला रस्ता जातो, आता तुम्ही त्या रस्त्याने जा.' त्या भिल्लाने सांगितल्याप्रमाणे स्वामी महाराजांनी मार्गक्रमण केले आणि काय आश्चर्य, शिष्य रेल्वेने पोहोचायच्या अगोदर स्वामी महाराज काशीला हजर! तिथे पोचल्यानंतर स्वामी महाराजांच्या लक्षात आले की ही ४-५ दिवसांची वाट आपण ४-५ तासामध्ये चालून आलो आहोत. हीच ती ईश्वरकृपा, सद्गुरूंची कृपा आहे. म्हणजे तपाचा दृढसंकल्प असेल आणि श्रद्धा बळकट असेल तर मोक्षापर्यंतची आपली वाटचालसुद्धा एका जन्मामध्ये होऊ शकते, हा ह्या गोष्टीचा अर्थ झाला. ■■■

# ।। सद्गुरुकृपा आणि शक्तिपात ।।

श्री. सुधीर गणेश बर्डे - ९८१९८९७८९६

**न गुरोधिकं तत्त्वं, न गुरोरधिकं तपः।**
**तत्त्वं ज्ञानात् परं नास्ति, तस्मै श्री गुरवे नमः।।**

**अर्थ :** गुरुतत्त्वापेक्षा अधिक श्रेष्ठ कोणतेही तत्त्व नाही. गुरुसेवेपेक्षा श्रेष्ठ तप नाही. गुरुंनी दिलेल्या आत्मज्ञानाहून श्रेष्ठ दुसरे कोणतेही तत्त्व वा ज्ञान नाही. अशा तत्त्वस्वरूप गुरु-देवांना प्रणाम असो.

म्हणूनच सद्गुरुंना ब्रह्मा, विष्णु, महेशाच्या स्वरूपात नमस्कार केला जातो.

**हरौ रुष्टे गुरूः त्राता, गुरौ रूष्टे न कश्चन।**
**तस्मात् सर्व प्रयत्नेन, श्रीगुरुं शरणं व्रजेत्।।**

म्हणजेच तिन्ही देव जरी रुष्ट झाले, तरी सद्गुरु रक्षण करतात. पण जर सद्गुरुच जर रुष्ट झाले तर मात्र कुणीही रक्षण करू शकत नाही. त्यासाठीच सर्वार्थाने सद्गुरुंना शरण जायला हवे. त्यांनी दिलेली उपासना, साधना नेमाने व प्रेमाने करावयास हवी.

मला राहून राहून वाल्या कोळ्याची गोष्ट प्रकर्षाने आठवते. पापांच्या खड्यांनी म्हणजेच दुष्कृत्यांनी रांजण भरला. ज्या आप्त-स्वकीयांसाठी हे त्याने केले, त्या आप्तस्वकीयांनीच ती जी दुष्कृत्ये त्याच्या हातून घडली, त्याच्यातील सहभाग नाकारला. प्रत्यक्ष देवांनीच देवर्षि नारदांची योजना केली व नारदमुनींनी शरण आलेल्या, प्रायश्चितदग्ध झालेल्या वाल्याकोळ्याच्या डोक्यावर वरद्हस्त ठेवला व क्षणार्धात रामनामामध्ये समाधी अवस्था प्राप्त करून दिली. देवर्षि नारदांनीच केलेला शक्तिपाताचा प्रभाव किती? वाल्या कोळ्याचे वाल्मिकी ऋषी झाले. ज्यांनी सर्व जगताला रामायणाची सुंदर कथा दिली. देवर्षि नारदांनी वाल्या कोळ्याला केवळ ''आपणा सारिखे करिती तात्काळ'' करून सोडले.

महाभारतामध्ये भगवान श्रीकृष्णाने स्वतःच सांदिपनी ऋषींना गुरु केले. स्वयं नारायणालाही मनुष्यजन्मात गुरु न करता न राहण्यासाठी हा आदर्श लोकांपुढे ठेवावा लागला.

त्याच जगद्गुरू श्रीकृष्णाने इंद्रपुत्र अर्जुनालाही आपला शिष्योत्तम केले व खल प्रवृत्तींचा संहार त्याच्या हातून करवला. म्हणूनच गुरुचे महत्त्व अनादि कालापासून अधोरेखित झाले आहे.

योगतपस्वी वेद शर्मांनी शिष्योत्तम दिपकाची परीक्षा घेतली. दिपक ही त्या परीक्षेत उत्तीर्ण झाला. स्वयं भगवान शंकर, विष्णू हे स्वतः दिपकाला वर देण्यासाठी पुण्यकाशी नगरीत प्रगट झाले. परंतु दिपकानेही स्वतःसाठी काही न मागता सद्गुरुसेवेत लीन व एकरूप राहण्यासाठीचा वर मागितला.

ही सद्गुरुतत्त्वांची परंपरा व शक्तिपाताची दीक्षा पुढेही अशीच चालत राहिली.

सद्गुरूकृपेचे व शक्तिपात दीक्षेचे अत्यंत विस्मयजनक अनुभव शिष्यांना व साधकांना येत असतात. माऊलीने तर प्रत्यक्ष मुक्या रेड्याच्या मुखातून वेद वदवून घेतले.

शिष्याचा, साधकाचा संपूर्ण कायापालट करणे, वृत्तिपालट करणे ही सद्गुरुंच्या शक्तिपाताची किमया.

पंचतत्त्वांना आपल्या अधीन ठेवणे हे फक्त आणि फक्त सद्गुरुच करू शकतात. अलिकडच्या काळात तर ह्याची प्रचंड उदाहरणे आपल्याला दिसतात. साईबाबांनी महामारीसारख्या रोगाला शिर्डीपासून दूर ठेवले. हल्लीच्या विज्ञानयुगात सुद्धा साथीच्या रोगांना (वायरल डिसीस) औषधांनी सुद्धा आटोक्यात ठेवणे शक्य होत नाही. जे साईबाबांनी त्यावेळी करून दाखविले.

संतशिरोमणी श्रीगजानन महाराजांनी कावळ्यांना आज्ञा केल्यावर १२ वर्षे कावळे त्या आडगावच्या परिसरात (जिथे भास्कर पाटलांना समाधी दिली गेली) फिरकले नाहीत. ब्रह्मगिरी गोसाव्याला शक्तिपात दीक्षा देऊन उपाधींपासून मुक्त केले.

शक्तिपाताचे सुंदर उदाहरण मला राहून-राहून जाणवते ते असे. तुकामाई चैतन्याने ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांच्या डोक्यावर वरद्हस्त ठेऊन कोरड्या विहिरीमध्ये १२ तास समाधी अवस्थेत नेले व तेथेच ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचा सद्गुरु शोध संपला.

प.पू. नारायणकाका ढेकणे महाराज ह्यांचे सद्गुरू

प.पू. लोकनाथतीर्थस्वामी महाराज ह्यांच्याकडे परमानंद नावाच्या आर्यसमाजी माणसाने दीक्षेची प्रार्थना केली. परमानंद दीक्षेच्या सर्व आचार-नियमांचे पालन करतच होते. त्यामुळे प.पू. लोकनाथतीर्थ स्वामी महाराजांनी परमानंद ह्यांना दुसऱ्या दिवशी दीक्षेसाठी बोलाविले. परमानंदजी स्वामींपासून ५ ते ७ फूट अंतरावर होते. स्वामीजींनी त्यांना डोळे बंद करण्यास सांगितले. स्वामींनी त्यांना स्पर्शही केला नाही. परमानंदांना प्रचंड क्रिया सुरु झाल्या व २ वेळा उल्टीही झाली. परमानंद पुन्हा शुचिर्भूत होऊन जागेवर बसले. स्वामीजींनी त्यांना प्रश्न केला की, ''आपणावर कधी विषप्रयोग झाला होता का?'' असे विचाले. त्यावर परमानंदांनी होय असे सांगितले. त्यास खूप वर्षे झाली व औषध उपचाराने तो विषप्रयोग शमविला गेला असे सांगितले. परंतु स्वामीजींच्या नुसत्या संकल्पाने, कृपादृष्टीने त्या विषाचा शेष भाग शरीरातून बाहेर फेकला गेला. म्हणूनच ''पाप क्षालानार्थ दीयते इति दीक्षा:'' असे म्हणतात. क्षालन कशाचे तर पापाचे, पूर्वसंचिताचे आणि व्याधीचेही.

नागपंचमी. दत्तपरंपरेतील प.प. नानामहाराज तराणेकर ह्यांची जयंती आहे. त्यांचे चरणी साष्टांग दंडवत करून ह्या सद्‌गुरुतत्त्वाला विनम्र अभिवादन करतो.

।। इति आलम् ।।

■■■



## अमावस्या मुक्तीसाठी प्रभावी उपाय : धनचिंता दूर करणारी कुबेर उपासना

**डॉ. प्रिया मालवणकर - ९७६९१६७९२५ /९९३०४०५९९९,**
**व्हॉटस् अप : ८२९११४१७०९२**

प्राचीन काळापासून द्रव्यसंकट दूर करण्यासाठी कुबेराची उपासना करण्यात येते. आर्थिक अडचणी, पैशाची चणचण, सतत वाढणारे कर्ज, पैसा हातात न टिकणे, मालमत्तेवरून होणारे वाद, विविध प्रकारचे प्रश्न कुबेराच्या नित्य उपासनेने दूर झाल्याचे बघायला मिळते.

**उपाय :**

(१) रोज कुबेर चालीसा या स्तोत्राचे पठन करणे.

(२) दर मंगळवारी व शुक्रवारी कुबेराचे मनोभावे पूजन व नामस्मरण करणे.

(३) दर बुधवारी किमान कुबेराची मूर्ती वा तसबीर पंचोपचाराने पूजा करणे. (पंचोपचार म्हणजे देवास हळद-कुंकू, अगरबत्ती धूप, दीप, पुष्प व नैवेद्य दाखविणे याला पंचोपचार म्हणतात.)

(४) घरात उत्तर दिशेला कुबेराची मूर्ती किंवा तसबीर स्थापन करावी. मुख दक्षिणेकडे हवे.

(५) बुधवार हा कुबेराचा वार मानण्यात येतो. या दिवशी कुबेराचे केलेले पूजन फलद्रुप होते. धूप दीप करून, खडीसाखर ठेवून आर्थिक उन्नतीची प्रार्थना करावी.



### कुबेराचे प्रभावी यंत्र

।। ॐ कुं कुबेराय नमः ।।

।। ॐ कुबेराय धन धान्यदिपतये नमः ।।

।। ॐ श्री कुबेर महालक्ष्मी नमः ।।

वरीलपैकी कोणताही एक मंत्र ११ किंवा २१ वेळा दिवसातून एकदा पठन करणे. दररोज शक्य नसल्यास बुधवारी तरी वरील मंत्राचे पठन करावे.

(पुढील अंकी वाचा - द्रव्य संकट हरण करणाऱ्या कुबेर यंत्राचे पूजन कसे करावे.)

**मार्गदर्शनासाठी संपर्क : डॉ. प्रिया मालवणकर,**
सी/६, स्वप्न साफल्य को.ऑप. सोसायटी,
जे. बी. टेमकर मार्ग, वरळी, मुंबई ४०० ०३०.
वरळी, मुंबई-४०० ०३०.

# ।। आयुर्वेदोक्त अध्यात्म ।।

वैद्य नरहर भोळे प्रभू - ९८६९१८०४२९

आयुर्वेद हे केवळ प्राचीन वैद्यकशास्त्र आहे, असे अनेकांचा समज आहे, परंतु हे अर्धसत्य आहे. वैद्यकासह, निरामय सदाचारी जीवन पद्धतीचे तत्त्वज्ञान सांगणारे शाश्वत शास्त्र म्हणजे आयुर्वेद. भारतीय मूलभूत तत्त्वज्ञानावर आधारित असे हे शास्त्र आहे. वेद, उपनिषदे, पुराणे, भगवत्गीतेसह संगीतशास्त्र, नृत्यशास्त्र, गणितशास्त्र, ज्योतिषशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादि सर्व भारतीय शास्त्रांचा मूळ पाया म्हणजे पंचमहाभूत सिद्धान्त. आयुर्वेद हे अथर्ववेदाचे, उपांग असल्यामुळे (इह खल्वार्युवेदं नामोपाङ्गमथर्ववेदस्य, सुश्रृत सू. १.६) आयुर्वेदाचेही मूळ तत्त्वज्ञान पंचमहाभूत सिद्धान्तावर आधारित आहे. पृथ्वी, जल, तेज वायू आणि आकाश या पंचमहाभूतां पासून सर्व विश्व निर्माण झाले. मनुष्यप्राणी पंचमहाभूतात्मक आहे. हे सर्व तत्त्वज्ञान सांगणारा आयुर्वेद कोणी निर्माण केला?

**आयुर्वेदावतरण**

आयुर्वेद शास्त्र ऋषीमुनींनी तयार केलेले शास्त्र आहे, असाही एक समज आहे. तसे नसून आयुर्वेद शब्दात लिहून त्याला ग्रंथरूप देणे व मूळ आयुर्वेदीय सिद्धान्ताचे निरूपण/स्पष्टीकरण करण्याचे कार्य ऋषीमुनींनी केले आहे. सर्व प्राणीमात्रांच्या आरोग्य रक्षणासाठी ब्रह्म देवाने आयुर्वेदाचे स्मरण केले व तो प्रजापतीला प्रदान केला. प्रजापतीने तो अश्विनीकुमारांना कथन केला. त्यांनी तो सहस्त्राक्ष इंद्राला दिला. इंद्राने तो आत्रेय आदि ऋषींना सांगितला. आत्रेयांनी अग्निवेश, भेल, जतुकर्ण, पराशर, हारीत, क्षारपाणि आदि शियांना शिकविला. या शिष्यांनी विविध तंत्रे बनविली आणि आयुर्वेदाला ग्रंथरुप दिले.

**आयुर्वेदोऽमृतानाम्**

ब्रह्म देवाने आयुर्वेद निर्माण केला नाही, त्याचे फक्त स्मरण केले. ज्याप्रमाणे केवळ परब्रह्माच्या इच्छेने या सृष्टीची रचना झाली, त्याचप्रमाणे त्याच्या केवळ स्मरणातून आयुर्वेदाचा अविर्भाव झाला. जे निर्माण होते ते नश्वर असते, अनित्य असते. आयुर्वेद निर्माण झाला नाही म्हणून तो नित्य आहे. म्हणजेच आयुर्वेदाचे मुलभूत सिद्धांत हे नित्य आहेत. कधीही न बदलणारे आहेत. म्हणजेच आयुर्वेद हा शाश्वत आहे. अमृत आहे. कधीही नाश न पावणारा आहे. आयुर्वेद हा अनादि म्हणजे आरंभरहित आहे. कारण तो कोणी निर्माण केला नाही. ज्याचा आरंभ होतो, त्याला अंतही असतो. आयुर्वेद अनादि अनंत आहे. म्हणून तो ब्रह्मस्वरूप आहे. या ब्रह्मस्वरूपातच शाश्वत सुख असते.

**सुखसंज्ञकम् आरोग्यम।**

सर्व पाणीमात्रांच्या आरोग्य रक्षणासाठी ऋषीमुनींनी आयुर्वेद भूतलावर आणला. स्वस्थस्य स्वाथ्य रक्षणमातुस्य विकार प्रशमनं च (चू. सू. ३०२४) अर्थात् निरोगी मनुष्याच्या आरोग्याचे रक्षण करणे आणि रोगग्रस्त मनुष्याला रोगमुक्त करणे, हे आयुर्वेदाचे प्रयोजन आहे. आयुष्याला हितकर काय व अहितकर काय व आयुष्यासाठी सुखकर काय व दुःखदायक काय, हितयुक्त आयुष्य, अहितयुक्त आयुष्य, सुखी आयुष्य आणि दुःखी आयुष्य म्हणजे काय याविषयी सविस्तर माहिती आयुर्वेदात दिली आहे. शरीराला दुःख देणारा तो विकार किंवा रोग मनुष्यप्राण्याला सुखकारक ते आरोग्य. सुखसंज्ञवाकमारोग्यं विकारो दुःखमेवच।

**सुखार्थ।**

संपूर्ण जगामध्ये होणाऱ्या सर्व हालचाली, क्रिया, प्रयत्न हे केवळ सुखप्राप्तीसाठीच असतात. लहान थोरांचे, गरीब-श्रीमंताचे एकच एक ध्येय म्हरजे सुखप्राप्ती. संपूर्ण विश्व हे आता सुखाचा कारखाना बनू पाहत आहे. वाग्भटाचार्य म्हणतात- सुखार्थ सर्वभूतांना मता सर्वा प्रवृत्तयः। (अ.ह. १.२०) अर्थात् सर्व प्राणीपाण्यांचे सुख हे एकच ध्येय असले तरी ते प्राप्त करण्याचे दोन मार्ग आहेत. एक प्रवृत्ती आणि दुसरे निवृत्ती. पहिल्या मार्गाने मिळणारे सुख हे वैषयिक सुख आणि दुसऱ्या मार्गाचे आत्मिक सुख. या वैषयिक सुखालाच संसारसुख असे म्हणतात आणि आत्मिक सुखाला मोक्ष सुख म्हणतात. संसारसुखासाठी जन्म-मरणाच्या फेऱ्यात रहावे लागते व मोक्षसुखामुळे या चक्रातून बाहेर येता येते. मोक्षसुख हे सर्वाधिक सुख आहे.

**न अल्पे सुखम्।**

यो वै तत्सुखम् छांदोग्य उ.अ. ७.२३.१ या श्रुतिवचनानुसार जे अनंत, जे अविनाशी जे सर्वाधिक आहे, ते सुख आहे. भौतिक सुख देणाऱ्या सर्व वस्तू नश्वर, विनाशी आहेत. यद् अल्पं तन्मर्त्यम्। नाश होते ते अल्पकालीन म्हणून अल्प असते. नाल्पे सुखमस्ति। छ.उ.अ. ७.२३ अर्थात् अल्पात सुख नसते. म्हणजे दु:ख असते. वाग्भटाचार्य म्हणतात, ''सुखं च न विना धर्मात्। (अ.हृ. २.२०) सुख हे धर्माचरणासाठी उत्तम आरोग्य असणे आवश्यक आहे.''

**आरोग्य मूलम्।**

धकाधकीचा मामला। कैस घडे अशक्ताला ।। दा. १९.१०.२२ असे श्री रामदास स्वामी आपल्या दासबोधात म्हणतात. प्रत्येकाने निरोगी रहावे. सशक्त व्हावे. निरोगी व सशक्त व्यक्तिच मनावर ताबा ठेवू शकेल व धर्माचरण करू शकेल. न अयम् आत्मा बलहीनेन् लभ्य:। दुर्बलांना आत्मप्राप्ति होत नाही, असे कठोपनिषदांत सांगितले आहे. याविषयी चरकाचार्य म्हणतात-

**धर्मार्थकाममोक्षाणामारोग्य मूलमुत्तमम्।**
**रोगास्तस्यापहर्तार: श्रेयसो जिवितस्य च । च.सू. १.१५**

धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थासाठी निरामय जीवन आवश्यक आहे. निरोगीत्वाशिवाय धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष प्राप्त होणे पूर्णत: अशक्य. आरोग्याशिवाय धर्माचरण करणे असंभव. परंतु रोग मात्र हे चतुर्विध सुख तसेच जीवन हरण करण्यासाठी टपलेला आहे. येथे श्रेय हा शब्द सुख या अर्थाने वापरला आहे. या ठिकाणी वैषयिक सुख अपेक्षित नाही. वैषयिक सुखाला प्रेय म्हणतात. श्रेय म्हणजे आत्मिक सुख. मोक्षप्राप्तीमुळे मिळते हे आत्मिक सुख. आत्मिक सुखप्राप्ती आरोग्यावर अवलंबून आहे.

**अध्यात्म-व्युत्पत्ती**

सर्व संस्कृत शब्द हे अर्थपूर्ण असतात. सर्व संस्कृत शब्दांची व्युत्पत्ती-म्हणजे शब्द कसा तयार झाला हे अभ्यासण्यासारखे असते. अध्यात्म हा शब्द अधि + आत्मन् (आत्मन:अधि) या दोन शब्दांपासून बनला आहे. अधि म्हणजे त्या विषयी. म्हणून अध्यात्म म्हणजे आत्म्याविषयी. आत्मा म्हणजे काय? तो कोठून आला? कोठे जाणार? त्यांचे स्वरूप काय? इत्यादि विषयी माहिती म्हणजे अध्यात्म. अध्यात्माचा सोपा अर्थ म्हणजे आत्म्याचा ध्यास.

आत्मानि इति अध्यात्मा-अध्यात्म शब्दाचा असाही एक अर्थ लावला जातो. म्हणजे आत्म्याच्या ठिकाणी कर्मेंद्रिय व ज्ञानेंद्रिय म्हणून कार्य करणारे मन निगडीत करणे. म्हणजेच मन आत्मसंमुख करणे. याचा अर्थ अध्यात्म. मनाला अंतर्मुख करण्यासाठी लागणारी वृत्ती म्हणजे सत्प्रवृत्ती. त्यालाच अध्यात्मप्रवृत्ती असे म्हणतात. अध्यात्म ही अनुभूती आहे. म्हणूनच ती वैयक्तिक स्वरूपाची आहे.

**अर्जुनाचा प्रश्न**

श्रीमद्भगवत्गीतेच्या आठव्या अध्यायात अर्जुनाने श्रीकृष्णाला विचारलेल्या अनेक प्रश्नांपैकी एक प्रश्न आहे. अध्यात्म म्हणजे काय?

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्मुच्यते। ८.३**

अक्षर म्हणजे ज्याचे कधी क्षरण होत नाही. म्हणजे जे कधी नाश पावत नाही. असे अविनाशी ब्रह्म आहे. ब्रह्म परमं म्हणजे श्रेष्ठ आहे. स्वभाव म्हणजे ब्रह्माचे शरीरात असणे. त्यालाच जीवात्मा असे म्हणतात. त्याला अध्यात्म नावाने ओळखले जाते. श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात-

**आणि आकाराचेनि जालेपण। जन्मधर्मातें नेणे।**
**आकारलोपी निमणे । नाही नाही।**
**ऐशिया आपुलियाची सहज स्थिती।**
**जया ब्रह्माची नित्यता असती।**
**तया नाम सुमद्रपती । अध्यात्म गा।**

आकार म्हणजे शरीर. शरीर नाश पावल्यावरही जे व्याधी नाश पावत नाही. अशा रितीने ज्या ब्रह्माची आपल्याच ठिकाणी जी निरंतर स्थिती असते, त्याला अध्यात्म असे म्हणतात.

**ज्ञानेश्वराचा साधनामार्ग**

अविनाशी ब्रह्माच्या प्राप्तीसाठी जो साधनामार्ग श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितला आहे, त्यावर भाष्य करताना श्रीज्ञानेश्वरीच्या अध्याय आठमध्ये श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की, बाहेर धावण्याची मनाची खोड मोडून मन अंतर्मुख होणे अत्यंत आवश्यक आहे. ही वाईट खोड जाण्यासाठी सर्व बाजूंनी संयमी व निग्रही जीवन घालवणे जरुर आहे. याप्रमाणे मन स्थिर झाल्यावर प्राणाबरोबर ॐकाराचे चिंतन करावे. काही काळाने चिंतन करता-करता ॐकाराचे स्मरणही नाहिसे होईल व पूर्ण ब्रह्मैक्याचा अनुभव येईल. अध्यात्म प्राप्तीसाठी मन:शांती महत्वाची ठरते.

**वायू च प्रणेता च मनसा**

पांचभौतिक द्रव्यांपासून बनलेले मानव शरीर आणि चैतन्य स्वरूप आत्मा यांना जोडणारे मन हे एक इंद्रिय आहे. मनाला स्वत्त्व असाही एक पर्यायी शब्द आहे. मन हे अणुस्वरूप म्हणजे अत्यंत सूक्ष्म आहे. मन, आत्मा मनाशी, मन इंद्रियाशी आणि इंद्रिये त्यांच्या त्यांच्या विषयाशी संयुक्त होतात व त्यामुळे ज्ञानप्राप्ती होते. या साखळीमध्ये मन नसेल तर आत्म्याला ज्ञान होत नाही. मनाची इंद्रियाकडे प्रेरणा मात्र शरीरस्थ वायुमुळे होत असते असे आयुर्वेद शास्त्र मानते.

धी, धृती आणि स्मृती या मनाच्या शक्ती आहेत. या शक्तींमुळे इंद्रियामध्ये शिरून त्या त्या विषयाचे ग्रहण करणे याला इंद्रिय-निग्रह म्हणतात किंवा अनिष्ट विषयापासून मनाने स्वत:च स्वत:चा निग्रह करणे ज्याला इंद्रिय-निग्रह असे म्हणतात, हे कार्य मनाकडून होते.

सत्व हा मनाचा गुण आहे. रज आणि तम हे मनाचे दोष आहेत. मनसः पुनरुद्दीष्टो रजश्च तम एव च। सू. १.५६ असे चरकाचार्य म्हणतात. रज आणि तम या दोन दोषांच्या अधिक्यामुळे इर्षा, शोक, भय, क्रोध, अहंकार द्वेष इ. विविध मानसिक विकार उत्पन्न होतात. (च.सू. ७.५६)

**वेगान् धारयेत्**

मलमूत्र विसर्जन, अधोवत, शुक्र, निर्गमन, शिंका, उचकी, ढेकर, तहान, भूका, निद्रा, जांभई, अश्रु इत्यादिंची प्रवृत्ति म्हणजे वेग थांबवू नयेत. हे बहिर्गमनोन्मुख वेग आहेत. हे वेग जाणूनबुजून बलाचा वापर करून निर्माण करू नयेत किंवा वेग आला असता त्याला अवरोध करू नये. या दोन्ही क्रियांमुळे वाताचा प्रकोप होतो व त्यामुळे विविध प्रकारचे व्याधि निर्माण होतात. परंतु काही वेग असे आहेत की, त्यांना जाणीवपूर्वक रोखून धरावे. त्यांना अवरोध करावा.

**धारयेत्तु सदा वेगान् हितैषी प्रेत्य चेह च।**
**लोभोर्ष्याद्विषमात्सर्यरागादीनां जितेंद्रियः। अ.हृ. ४.२४**

इह लोक व परलोकांत हित व्हावे अशी इच्छा असणाऱ्याने जितेंद्रिय बनून लोभ, इर्षा, द्वेष, मत्सर, रागादि वेगांचे धारण करावे. त्यामुळे मन शांत, स्थिर, अंतर्मुख होण्यास मदत होते. हे वाटते तितके सोपे नाही. त्यासाठी मनावर लहानपणापासूनच चांगले संस्कार होणे आवश्यक आहे. संस्कार हे फक्त संस्कार केंद्रात जाऊन होत नाहीत. संस्कार ही एक अखंड प्रक्रिया आहे. त्यात सातत्य हवे. सातत्य ही तपश्चर्या आहे. त्यासाठी निग्रह, नियमितता, नम्रता, संकल्प हवा. म्हणजेच धर्माचरण हवे.

**धर्म म्हणजे काय?**

धर्म शब्दाचा रिलीजीयन हा अर्थ अभिप्रेत नाही. हिंदू ख्रिश्चन, मुसलमान इ. मनुष्यामनुष्यात दुरावा निर्माण करणारे मानव निर्मित समूह म्हणजे धर्म हा अर्थ, आयुर्वेदासारख्या अपौरुषेय शास्त्रात असणे शक्य नाही. आयुर्वेद हे समस्त मानव प्राण्याच्या आरोग्यासाठी अवतरलेले शास्त्र आहे. शास्त्र हे जातीधर्माच्या उद्देशाने कधीच संकुचित वृत्तीचे असू शकत नाही.

धर्म हा शब्द संस्कृत भाषेतील धृ या धातुपासून बनलेले नाम आहे. ''धारणात् धर्मः इति आहु'' ''धरति लोकान्'' ''ध्रियते पुण्यात्सधिः'' अशा प्रकारांनी त्याचा अर्थ लावला जातो. जो धरून ठेवतो तो, लोकांना समाजाला एकत्र धरून ठेवतो तो किंवा जो पुण्यात्मे आचरतात तो धर्म.

**आचारः परमो धर्मः**

आचार हा श्रेष्ठ धर्म आहे. सदाचारामुळे धर्म पालन होते. सदाचारामुळे सत्प्रवृत्ती येते व सत्प्रवृत्तीमुळे अध्यात्म प्राप्त होते. म्हणून निरामय आयुष्यासाठी आचार अतिशय महत्वाचा आहे. आचार या शब्दाने आहार आणि विहार दोहोंचा समावेश होतो. **अष्टांग हृदय** या ग्रंथात सूत्रस्थान या पहिल्या भागात दिनचर्या हा दुसरा अध्याय लिहून आचाराला अध्यात्मासाठी किती महत्व आहे, हे दाखविले आहे. दिन म्हणजे दिवस + रात्र आणि चर्या म्हणजे चरण अर्थात् कर्तव्य दिनचर्या अध्यायात अनेक सत्कर्तव्य - सत्कर्माचा उल्लेख केला आहे.

**स्नानम् पाप्माजित्**

ब्राह्ममुहुर्तावर स्वास्थ्य रक्षणासाठी उठावे. स्नान इ. कर्मांनी देहशुद्धि करावी. कारण ते अग्निदिनक आयुवर्धक, उत्साहवर्धक, बलदायक आहे. अध्यात्माच्या दृष्टीने अतिमहत्वाचे म्हणजे स्नान हे पापनाशक आहे.

**व्यक्तीने वागावे कसे?**

ज्यांच्याकडे साधनसामुग्री नाही, जे व्याधिग्रस्त आहेत. ज्यांना नियोगजन्य दुःख म्हणजे शोक झाला आहे. अशा व्यक्तींना यथाशक्ति मदत करावी. सर्व प्राणीमात्रांवर दया करावी. कीडे किटकांनाही आपल्याप्रमाणेच वागवावे, म्हणजे त्यांना त्रास देऊ नये.

यश आणि सर्वात महत्वाचे म्हणजे शाश्वत लोक म्हणजे सर्व प्राप्ती होते.

येथे ऐश्वर्य या शब्दाचा अर्थ सम्पन्नता असा असून त्याचबरोबर योगामधील अष्टविध ऐश्वर्यहि आहे. याचा उल्लेख चरकाचार्यांनी शरीरस्थानाच्या पहिल्या अध्यायात १३९ व्या श्लोकात केला आहे. जिज्ञासूनी तो अवश्य वाचावा.

शाश्वत लोकांबाबत श्रीमद्भगवतगीतेत खालील उल्लेख आहे.

यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम। १५.६ म्हणजे जेथे जावून मनुष्य पुन्हा परत येऊ शकत नाही म्हणजे पुनर्जन्म होत नाही ते माझे उत्तम गृह (स्वर्ग) आहे. म्हणजे आचार या श्रेष्ठ धर्माचे काटेकोर पालन करणे म्हणजे अध्यात्म असे आयुर्वेदाचे मत आहे, असे म्हटले तर चुकीचे ठरणार नाही. म्हणूनच धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चार पुरुषार्थामध्ये धर्माला प्रथम प्राधान्य दिले आहे.

**मोक्ष म्हणजे काय?**

मोक्ष म्हणजे मुक्ती. पुरुषस्य संसारजन्मारणादिभि: असंयोग। (च.वि. ८.३७) म्हणजे मुक्ती. अर्थात् संसार, जन्म, मरण या चक्रातून दूर असणे म्हणजे मोक्ष. चरकाचार्य म्हणतात.

**योग मोक्षे च सर्वसां वेदनानामवर्तनम्।**
**मोक्षे निवृत्तिर्नि: शेषा योगो मोक्ष प्रवर्तक:। च.शा. १.१३६**

वेदना म्हणजे संवेदना अनुकुलवेनदं सुखं प्रतिकुलवेदनं दु:खम्। असे तर्कसंग्रहकार म्हणतात. मनाला अनुकुल संवेदना देणारे सुख व प्रतिकुल संवेदना देणारे दु:ख, योग आणि मोक्षामध्ये सर्व सहवेदनापासून मुक्त होता येते. म्हणजे मन निर्विकारी होते. मोक्षामध्ये वेदनांची नि:शेष निवृत्ति होते. म्हणजेच संपूर्णपणे वेदनांपासून मुक्त होता येते. वेदनांचा लवलेशही राहात नाही. परंतु योग हा मोक्षाचा प्रवर्तक आहे.

मोक्ष म्हणजे चिरशांति, विपाप, विरज, शान्तपर, अक्षर, अव्यय, अमृत. ब्रह्म निर्वाण शांति हे मोक्ष शब्दाचे पर्याय आहेत.

मोक्षो रज: तमो अभावात्। रज आणि तम या मनाच्या दोन दोषांचा अभाव म्हणजेच मोक्ष. त्यासाठी आयुर्वेदोक्त धर्माचरण हा एक उत्तममार्ग आहे. त्यामुळे आरोग्यहि उत्तम राहते.

**आयुर्वेद सर्वांसाठी**

**स च अध्येतव्यो ब्राह्मण राजन्य वैश्ये:। तथ अनुग्रहार्थ पाणिनां ब्राह्मणै:। आरक्षणार्थ राजन्यैं:, वृत्यर्थ वैश्ये:। सामान्यतो वा धर्मार्थकाम परिग्रहार्थ सर्वे:।।** (च.सू.अ. ३०.२७).

आयुर्वेदाचे अध्ययन केवळ वैद्यांनीच करावे असे नाही. तर धर्म, अर्थ, काम प्राप्तीसाठी सर्वांनीच आयुर्वेदाचे अध्ययन करावे, शरीर व मन निरोगी राहण्यासाठी कायिक, वाचिक आणि मानसिक शुद्धतेसाठी आयुर्वेदोक्त नियमांचे पालन करावे. चरकाचार्य म्हणतात-

**यत् च आयुर्वेदोक्त अध्यात्यम् अनुध्यायति, वेद्यति**
**अनुविधीयते वा सो अपि अस्य परो धम;। च.सू.अ. ३०.२७**

जो आयुर्वेदात सांगितलेल्या अध्यात्माचे ध्यान करतो. दुसऱ्यांना सांगतो व स्वत:च्याच अध्यात्मज्ञानानुसार वागतो, आचरण करतो हा त्या व्यक्तीचा श्रेष्ठ धर्म आहे. आपण सर्वजण आयुर्वेदोक्त आचार-विचारांचे, नितीनियमांचे, पथ्यापत्याचे पालन करून सदाचारी निरामय समाज तयार करूया. अमृत अशा आयुर्वेदाप्रमाणेच आपणही अक्षर होऊया. ■■■

## ।। प्रार्थना ।।

*हे सद्गुरु देवा! तुम्हीच प्रत्यक्ष विश्वनियंते आहात. तुम्हीच निर्माता, कर्ता आणि प्रत्येक गोष्टीचे आधारस्तंभ आहात. तुमचा दिव्य संदेश कृतीत उतरविण्यासाठी, ते तुम्हीच, ज्यांनी मला येथे पाठविले आहे. मी फक्त तुमच्या आज्ञेची कार्यवाही करणारा आहे. मी मनोमन तुम्हाला प्रार्थना करतो की, माझ्या हृदयात अहंकार किंवा आत्मप्रौढीचा शिरकाव होऊ देऊ नकात. ज्याने माझे मन कलुषित होईल, त्या नावाचा किंवा प्रसिद्धीचा हव्यास नको. सर्व जबाबदारीचे ओझे तुम्ही जे माझ्यावर सोपविले; वास्तविक पाहता ते तुमचेच कार्य आहे. आशीर्वाद द्या की, तुमचे काम तुमच्या हातातला एक आयुध म्हणून पार पाडेन आणि कामाचे फळ अखेरी तुमच्याच कमलचरणी वाहीन सदैव मला योग्य मार्गदर्शन करा. हीच माझी नम्र प्रार्थना!* ।।श्रीराम जयराम जयजयराम ।।

# दान महिमा

श्री. जीवन चौधरी (एम्.डी. - आयुर्वेद) - ९९७०२०९४३५

''शतेषु जायते शूरः सहस्त्रेषु च पंडितः।
वक्ता शतसहस्त्रेषु दाता भवति वा नवा।।''

शंभरात एक शूर अशी व्यक्ती सापडते, तर हजारात एक व्यक्ती विद्वान सापडते, तसेच लाख व्यक्तींपैकी एखादा कोणी वक्ता (उत्तम बोलणारा) आढळतो तर दाता (दान देणारा) शोधल्यावर सुद्धा मिळेल किंवा नाही हे निश्चित सांगता येत नाही.

''तपः परे कृतयुगे त्रेतायां ज्ञानमुच्यते।
द्वापारे यज्ञमेवाहुदनिमेकं कलौ युगे।।'' मनुस्मृति

मनुष्य कल्याणाच्या साधनात सत्ययुगात तप, त्रेता युगात ज्ञान, द्वापार युगात यज्ञ आणि कलियुगात एकमात्र दान हेच साधन आहे.

**दानासाठी स्थळ, काळ व पात्र विचार**

''दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे।
देशे काले च पात्रे च तद्दाने सात्विकं स्मृतम्।।
(गीता-१७/२०)

**दानासाठी योग्य स्थान :** दान पवित्र स्थळावर केलेले अधिक चांगले. जसे की, काशी, मथुरा, जगन्नाथपुरी, गंगोत्री, यमुनोत्री, हरिद्वार, प्रयाग, गोशाला आदि स्थानी दान केलेले अधिक पुण्यप्रद असते.

**दानासाठीचा योग्य काळ :** शुभ काळात दान देणे अधिक श्रेयस्कर असते. अमावस्येला केलेले दान अधिक पुण्यप्रद असते तर त्यापेक्षा शंभर पट तिथिक्षय असेल तेव्हा तर त्यापेक्षा शंभर पट मेष संक्रांतीला तर त्यापेक्षा शंभर पट अक्षयतृतियेला तर त्यापेक्षा शंभर पट सूर्य दक्षिणायनात असताना होतो. त्यापेक्षा शंभर पट चंद्र ग्रहणाच्या वेळी देणे. परंतु मृत्यूच्या वेळी केलेले दान सर्वश्रेष्ठ आहे. तसेच अन्नदान व जलदान सर्वश्रेष्ठ आहे.

**दानासाठी योग्य व्यक्ती :** सत्पात्रास दिलेले दान सर्वश्रेष्ठ दान असते. याज्ञवल्क्य ऋषींनुसार अन्य वर्णापेक्षा ब्राह्मणास दिलेले दान सर्वश्रेष्ठ आहे. जो ब्राह्मण धर्मनिष्ठ, तपस्वी, सत्यवादी, संयमी, ध्यानी आणि जितेंद्रीय असेल त्यास सत्पात्र असे संबोधावे.

याबाबत आणखी एक मत आहे, ''अपात्रे दीयते दानं दातारं नरकं नयेत्।। कुपात्र । अपात्रास दिलेल्या दानाने दान देणारा नरकात जातो. सात्विक, राजस व तामस असे दानाचे तीन प्रकार आहेत. निःस्वार्थ दान सात्विक असते, तर प्रयोजनपूर्वक किंवा काही साध्य करण्यासाठी केलेले दान राजस दान आहे. आणि नीच व्यक्तीला दिलेले दान तामस होय.

**दानाचे चार विभाग (महाभारत)**

**(१) नित्यदान** - प्रत्येक व्यक्तीस आपआपल्या सामर्थ्यानुसार व कर्तव्यबुद्धीने काहीतरी दान द्यावे. जो मनुष्य क्षत्रिय, कुलीन, विनयी व तपस्वी, सदाचारी व्यक्तींना दान देतो, ती व्यक्ती परमपदास पोहोचते. शास्त्रात प्रत्येक गृहस्थास पाच प्रकारचे ऋण सांगितले आहेत. जसे - देवऋण, पितृऋण, ऋषिऋण, भूत व मनुष्यऋण यापासून मुक्त होण्यासाठी प्रतिदिन पंचयज्ञ करावा. अध्ययनाने व अध्यापनाने ऋषिऋण, श्राद्ध व तर्पणाने पितृऋण, हवनाने देवऋण, बलिवैश्वदेव, भूतऋण व अतिथि सत्कार मनुष्यऋण हे प्रत्येक दिवशी केल्यास मनुष्य ऋणमुक्त होतो.

**(२) नैमित्तिक दान** - अजाणतेपणी आपल्याकडून घडलेले पाप यांच्या शमन हेतु तीर्थ आदी पवित्र देशस्थळी सत्पात्री दिलेले दान म्हणजे नैमित्तिक दिलेले दान होय. हे सकाम व निष्काम दोन प्रकारचे असते.

**(३) काम्यदान** - कोणत्याही मनोकामना पूर्ण होण्यासाठी केलेले दान, कोणत्या कार्यसिद्धीसाठीचे दान हे काम्यदान होय. शास्त्रात विविध दानांचा उल्लेख केलेला आहे, जसे तिलदानाने इच्छित संतान, दीपदानाने उत्तम दृष्टी, गृहदानाने सुंदर महल, स्वर्णदानाने दीर्घायुष, वृषभदानाने अचल संपत्ती, शय्यादानाने उत्तम पत्नी, जलदानाने तृप्ती व गोदानाने ब्रह्मलोक प्राप्ती होते.।

**(४) विमलदान** - भगवत्प्राप्ती होण्यासाठी केलेले निष्काम दान म्हणजे विमलदान होय. हे सर्वश्रेष्ठ दान होय.

"द्विहेतुः षडधिष्ठानं षडंगं च द्विपाकयुक्।
चतुष्प्रकारं त्रिविधं त्रिनाशं दानमुच्यते।।"
(स्कंदपुराण)

म्हणजेच दानाचे दोन हेतु, सहा अधिष्ठान, सहा अंग, दोन प्रकारचे फळ, चार भेद व तीन विनाश करण्याचे कारण याला दान म्हणतात.

**दानाचे हेतू -**

दानाचे श्रद्धा व शक्ती असे दोन हेतु आहेत. दानाच्या मात्रेपेक्षा (दानामागची) श्रद्धाच त्याच्या फळाच्या वृद्धी क्षयाचे कारण आहे.

**(१) श्रद्धा** - दानात श्रद्धेला फार महत्व आहे. विनाश्रद्धेने केलेले, सर्वस्व दान सुद्धा निरुपयोगी आहे. न्यायोपार्जित धन जे सत्पात्री दान देतात ते अल्पदान दिल्याने सुद्धा अधिक पुण्य प्राप्त करतात.

**(२) शक्ती** - कुटुंबाचे पालनपोषण केल्यानंतर जे धन उरेल त्यास दानाची शक्ती म्हणतात. आपल्यावर आश्रित व्यक्तींना सुखी ठेवून शक्य होईल ते दान देणे हे अपेक्षित आहे.

**दानाचे अधिष्ठान -**

धर्म, अर्थ, काम, लज्जा, हर्ष व भय हे दानाचे सहा अधिष्ठान आहेत. विनाप्रयोजन धार्मिक भावनेने दिलेले दान 'धर्मदान' होय. प्रयोजनपूर्वक दिलेले दान 'अर्थदान' होय. सूरापान वा इतर ठिकाणी अनधिकारी व्यक्तीस दिलेले दान 'कामदान' होय. लज्जावश केलेले दान 'लज्जादान'! शुभ समाचार ऐकून केलेले दान 'हर्षदान' होय. निंदा, हिंसा, किंवा अनर्थाच्या भयापासून विवश होऊन दिलेले दान 'भयदान' होय.

**दानाचे सहा अंग**

दानकर्ता, प्रतिग्रह घेणारा, शुद्धी, दानाचा पदार्थ, देश आणि काल हे दानाचे सहा अंग आहेत.

**दानकर्ता** - हा धर्मात्मा, व्यसनरहित, पवित्र व अनिंदित कर्माचा व्यवसाय करणारा असायला हवा.

**प्रतिग्रहीता** - (धान घेणारा) सात्विक, दयाळु, कुळाचे श्रेष्ठ तथा शुद्ध जीवन निर्वाह करणारा हवा.

**शुद्धी** - दानाच्या वेळी याचकाप्रति हार्दिक प्रेम व बघून प्रसन्नता वाटली पाहिजे.

**दानाचे पदार्थ व धन**

मेहनतीने व उत्तम मार्गाने कमावलेले धनच दानास पात्र आहे. अधर्माने मिळालेले धन, दानास पात्र नाही.

**देश** - ज्या देशात जो पदार्थ दुर्लभ आहे, ते दान सर्वश्रेष्ठ होय.

**काळ** - योग्य काळी, योग्य वेळी दिलेले दान श्रेष्ठ होय.

**दानाचे फळ**

दानाची फळे दोन प्रकारची असतात. प्रथम इहलोकासाठी आणि दुसरे परलोकासाठी होय.

**दानाचे प्रकार चार** - ध्रुव, त्रिक, काम्य व नैमित्तिक हे चार प्रकार आहेत. सार्वजनिक कार्यासाठी केलेले दान 'ध्रुव' दान. जे प्रतिदिन केले जाते, ते 'त्रिक' दान होय. कोणत्याही इच्छा पूर्ण होण्यासाठी केलेले दान 'काम्यदान' होय. विद्या प्राप्ती आदि कारणांसाठी दिलेले दान नैमित्तिक दान होय.

**दानाचे तीन भेद** - उत्तम, मध्यम, कनिष्ठ असे दानाचे तीन भेद आहेत. कूप, गृह, मंदिर, भूमी, विद्या, गोदान, स्वर्ण व प्राण हे आठ दान उत्तम दान, होत. अन्न, बगिचा, वस्त्र व वाहनादी दानास मध्यम दान असे म्हणतात. चप्पल, छत्री, दही, आसन, दीपक, काष्ठ (लाकूड) यांचे दान 'कनिष्ठ' दान होय.

**दानाच्या नाशाचे तीन कारण**

पश्चाताप, अपात्रता व अश्रद्धा ही तीन कारणे होत. दान दिल्यानंतर पश्चाताप होणे तसेच अपात्र व्यक्तीस दान देणे व अश्रद्धेने दान देणे हे दानाच्या नाशाची तीन कारणे आहेत.

**अन्य प्रकारचे दान**

(१) **मधुर वचन दान** - कोणी कष्टी/दुःखी मनुष्यास मधुर वचनदान करून त्याची सांत्वना करणे म्हणजेच मधुरवचन दान. (२) **प्रेमदान** - प्रेमभाव दान करणे, त्यासाठी त्याग करणे हे सुद्धा दान आहे. (३) **आश्वासन दान** - संकटसमयी व्यक्तीला आश्वासन देणे हे सुद्धा एक प्रकारचे दान आहे. (४) **आजिविका दान** - आजिविका म्हणजेच उत्पन्नाचे साधन मिळवून देणे यालाच आजिविका दान म्हणतात. (५) **छायादान** - वृक्षछाया म्हणजेच रस्त्यावर दुतर्फा झाडे लावून छायादान करणे. (६) **श्रमदान** - श्रम करून लोकांचे हित साधणे. (७) **शरीर अंग दान** - डोळे, किडनी, अवयव दान. (८) **कालदान** - एखाद्यास आपला अमुल्य वेळ देणे. (९) **क्षमादान** - क्षमा करणे. (१०) **विद्यादान** - मोक्षप्राप्तीसाठी व व्यावहारीक गोष्टींसाठी

उपयुक्त विद्येचे दान. (११) **पुण्यदान** - व्यक्तीचे पुण्य काही संकल्प करून दुसऱ्यास दान देणे यास पुण्यदान म्हणतात. (१२) **जपदान** - गुरुंना आरोग्यासाठी जपदान करतात, ते दान. (१३) **भक्तिदान** - भक्ती-साधना करणे. (१४) **आशिषदान** - आशीर्वाद देणे. याच प्रकारे द्रव्यावर आधारित काही दान आहेत.

(१) **आश्रयदान** - ज्या व्यक्ती संपन्न असतात, त्या व्यक्ती धर्मशाळा वगैरे बनवतात व आश्रयदान देतात. (२) **भूमिदान** - संपन्न व्यक्ती गरीब ब्राह्मणांना भूमीचे दान देतात. (३) **स्वर्णदान** - स्वर्णदानाने आयु व आरोग्य वृद्धी होते म्हणून स्वर्णदानाचे महत्व विशेष आहे. (४) **कन्यादान** - भारतीय संस्कृतीत कन्यादानाला फार महत्व आहे. म्हणून कन्यादान म्हणजे एक प्रकारचे दानच आहे. (५) **आरोग्य दान** - रोग्याची सेवा करणे, औषधे देणे, यालाच आरोग्य दान म्हणतात. (६) **वस्त्र दान** - वस्त्रांचे दान. (७) **ग्रहदान** - विशिष्ट काळात ग्रहांची स्थिती अनुकूल होण्यासाठी म्हणून केले दान म्हणजेच ब्राह्मणाला दिलेले दान ग्रहदान. (८) **तुला दान** - आपल्या वजनाएवढ्या वस्तूचे दान देणे. (९) **पिंड दान** - मृत्युनंतर मृत व्यक्तीच्या शांतीसाठीचे केलेले दान. (१०) **गोदान** - गाईचे शास्त्रोक्त केलेले दान.

**दानात दिल्या जाणाऱ्या वस्तूंचे देवत्त्व**

| द्रव्य दान / देय द्रव्य | देवता |
|---|---|
| भुमी, गाय | विष्णु, रुद्र |
| कुंभ, जलपात्र, समुद्र रत्न | वरुण |
| स्वर्ण व सर्व धातू | अग्नि |
| सर्व गंधयुक्त द्रव्य | गंधर्व |
| विद्या, पुस्तक आदी | सरस्वती |
| वृक्ष, पुष्प, शाक, फल | वनस्पति देवता |
| गृह दान | सर्व देव |
| अनुक्त पदार्थ | विष्णु |
| प्राणरहित पदार्थ | आंगिरस |

**दानाबद्दल रहस्य :**

दान देण्याबाबत महत्वाचे रहस्य हे आहे की, दान देतांना माणसाची वृत्ती खूप महत्वाची आहे. जर दानामागे काम्य हेतु असेल तर त्यामागचा दानाचा उपदेश सफल होत नाही.

**''दानेन भूतानि वशिभवन्ति, दानेन वैशष्यपि यन्ति नाशनम्।**
**परोऽपि बंधुत्वमुपैति दानैदनि हि सर्वव्यसनानि हस्ति।।**

दानाने सर्व प्राणिमात्र वशिभुत होतात, दानाने वैरभाव नष्ट होतो, दानाने दुरचा सुद्धा बंधु बनतो व दान सर्व व्यसनांना दूर करते. सर्व दानांमध्ये सर्वश्रेष्ठ दान अन्नदानाला म्हटले आहे.

''सर्वषामेव दानानामन्न श्रेष्ठमुदाहृतम् ।।''

याचे मुख्य कारण म्हणजे सर्व प्रकारचे दान देताना देणारा व घेणारा हे दोघही अनंत मर्यादिपर्यंत दान देऊ शकतात व याचक सुद्धा अधिक अभिलाषा ठेवतो. पण अन्नदान एकच दान आहे, ज्यात याचक स्वत: म्हणतो की, मला पुरे झाले. हेच दानाचे महत्व व श्रेष्ठत्व!

**स्कंद पुराणातील दानाचा महिमा :**

''भुप्रदो मण्डलाधीशः सर्वत्र सुखितोऽन्नदः।''
**तोयदाता सुरूपः स्वात् पुष्टश्चान्नप्रदो भवेत्।।**
**प्रदीपदो निर्मलाक्षो गोदातार्य्यमलोकभाक् ।**
**स्वर्णदाता च दीर्घायुस्तिलदः स्याच्य सुप्रजः।।**
**वेश्मदोऽत्युच्चसौधेशो वस्त्रदश्चंद्रलोकभाक्।**
**हयप्रदो दिव्य देहो लक्ष्मीवान् वृषभप्रदा।।**
**सुभार्यः शिबिकादाता सुपर्यकप्रदोऽपि च ।**
**श्रद्धाया प्रतिमृष्टति श्रद्धया यः प्रयच्छति ।।**
**स्वर्गिणौ तावुभौ स्यातां पततोऽश्रद्धया तप।।**

(स्कंदपुराण-६-९५-९९)

भुमिदान करणारा मंडलेश्वर होतो, अन्नदाता सर्वत्र सुखी होतो. जलदान देणारा सुंदर रुप मिळवतो. भोजन देणारा हृष्ट व पुष्ट होतो. दीप देणारा निर्मल नेत्रांनी युक्त असतो. गोदान देणारा सूर्य लोकांचा भागिदार होतो. सुवर्ण देणारा दीर्घायु व तिळ देणारा उत्तम प्रजायुक्त असतो. घर देणारा मोठ्या महालाचा मालक होतो. वस्त्र देणारा चंद्रलोकात जातो. घोडा देणारा दिव्य शरीर युक्त होतो. बैल देणारा लक्ष्मीवान् होतो. पालकी/पलंग देणारा सुंदर पत्नी प्राप्त करतो. जो श्रद्धेने दान देतो व जो श्रद्धेने ते ग्रहण करतो, ते दोघेही स्वर्गलोकांचे अधिकारी असतात. तर अश्रद्धेने दोघांचे अध:पतन होते.

आयुर्वेदात सुद्धा अनेक ठिकाणी दानाचे महत्त्व वर्णिले आहे. आयुर्वेदात दैवव्यापाश्रय, युक्तव्यापाश्रय व सत्वावजय असे रोगचिकित्सेचे प्रकार आहेत. त्यातील दैवव्यापाश्रय चिकित्सेत दान, धर्म, तपश्चर्या असे उपाय सांगितले आहेत. त्या उपायांनी शारीरिक व्याधींचे उपशमन होते व त्यामुळे धार्मिक मार्गाद्वारे व्याधी शमन होऊन शरीर सुदृढ होते.

■■■

# उपनिषदे - निर्मिती, व्युत्पत्ती व हेतू

श्री. आशुतोष पुराणिक - ९७५७२४०८९२

**निर्मिती :**

प्रगत मानवी जीवन एक विचार मंथन असते. ज्ञानाची लालसा माणसाला अनादि काळापासून आहे. या ज्ञान लालसेतून, विचारमंथनातून तत्त्वज्ञानाचे नवनीत निघत असते. प्राचीन काळापासून मानवाला अनेक गूढ प्रश्न सतावत आले आहेत. उदा. पृथ्वीची उत्पत्ती, सृष्टीची निर्मिती मनुष्य जन्म- का? व कशासाठी? मानवी जीवनाचे ध्येय कोणते? सृष्टीविश्वातील गूढ तत्त्वे कोणती? विश्वाची निर्मिती कोणी केली? कां केली? एक ना अनेक प्रश्न! असे अनेक प्रश्न मानवाला अस्वस्थ करीत असतात व तो त्यांचा शोध घेण्याचा प्रयत्न करीत असतो. या विषयी विख्यात जर्मन विचारवंत 'कांट' याची एक कथा मोठी विचारात घेण्यासारखी आहे. कांट यांना सकाळी फिरायला जाण्याची सवय होती. चालत असतांना त्यांना उजवा हात मागे-पुढे हलविण्याची सवय होती. एक दिवस असेच हात हलवत असतांना त्यांचा हात एका सभ्य गृहस्थांच्या हाताला लागला. एकदम त्यांनी विचारले, ''क्षमा करा, आपण कोण आहांत?'' कांट म्हणाले, ''अहो, तुमचे थोर उपकार झालेत - मी तोच विचार करीत आहे की, 'मी कोण आहे?' ('Who am I?') या व अशा अनेक प्रश्नांची उत्तरें प्राचीन भारतीय ऋषींनी शोधण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी एका शिक्षण पद्धतीची आवश्यकता होती. गुरु-शिष्य-पाठशाळा ही ती गरज यातूनच गुरु-शिष्य परंपरा - गुरुकुल पद्धतीचा उगम व विकास झाला व त्यात अनेक विषय हाताळले गेले. प्रामुख्याने या ज्ञानाच्या दोन शाखा होत्या : (१) आधि भौतिक ज्ञान, (२) आधि आध्यात्मिक ज्ञान. पैकी आध्यात्मिक ज्ञान अधिक गूढ, क्लिष्ट होते. त्यांत आत्मा, ईश्वर, ब्रह्म, परब्रह्म इ. विषय येतात. या गूढ तत्त्वांचा शोध घेण्याचा प्रयत्न प्राचीन ऋषींनी केला. त्याचे स्वरूप प्रश्नोत्तर स्वरूपात होते. ''प्रश्नोपनिषद्'' नावाचे स्वतंत्र उपनिषदच आहे. याच विचार मंथनातून 'उपनिषदांचा' जन्म झाला.

असे म्हणतात की, दोन विद्वान एकत्र आले व त्यांनी चर्चा केली, गप्पा गोष्टी केल्या म्हणजे - त्यांची शास्त्रें बनतात. भर्तृहरि म्हणतात–

'या स्तैषां स्वैरकथास्तां, एव भवति शास्त्राणि।'

प्रज्ञावंत ऋषी व जिज्ञासू शिष्य यांचे हृदय संवाद - म्हणजेच 'उपनिषदे'!

**व्युत्पत्ती :**

'उपनिषद्' शब्दाची व्याप्ती, व्युत्पत्ती शोधणे आवश्यक ठरेल! व्याकरण दृष्ट्या 'उपनिषद्' शब्द– उप+नि+सद् = तीन शब्दांपासून तयार झाला आहे. उप + नि = हे दोन उपसर्ग आहेत त्यांचा अर्थ– उप = जवळ, नि = नितराम् निष्ठेने व सद्; धातू = सद् = चांगले, श्रेष्ठ असे गुरु.

**अर्थ :** श्रेष्ठ अशा ज्ञानी (आध्यात्मिक) सद्गुरुंजवळ जाऊन अत्यंत निष्ठेने ज्ञान मिळविणे. असा त्याचा सर्वसाधारण सरळ अर्थ. येथे प्रातः स्मरणीय विनोबांनी या 'नि'ला फार महत्त्व दिले आहे, ते म्हणतात

'नि = म्हणजे निष्ठेने; स्था = राहाणे, सद्गुरुजवळ निष्ठेने ज्ञान ग्रहण करणे. हे खरे शिक्षण! नि = या शब्दाची आणखी एक ओळख 'स्वतःला झिजवणारा' गुरु सेवेत सर्वस्व अर्पण करणारा.

आणखी एक व्युत्पत्ती-

**''उप समीपं निषीदति प्राप्नोति इति उपनिषद्।।''**

**अर्थ :** ज्याच्या द्वारा परम समीपभूत परब्रह्माचा साक्षात्कार होतो ते उपनिषद्! आद्य शंकराचार्यांनी उपनिषदांची व्याख्या अशी केली आहे ''षदलृ विशरणगत्यवसादनेषु''

पदपाठ : सद् = गती, विशरण = विध्वंसन, गती = जन्म-मृत्यू,जरा यांचे निवारण करणारी विद्या.

**अर्थ :** अविद्येचा विध्वंसन करणारी जी विद्या ती - उपनिषद् विद्या! आणखी एक व्युत्पत्ती-

**उपनिषद्यते प्राप्यते**
**ब्रह्म्यात्म भावोऽनया। - इति उपनिषद्।।**

**अर्थ :** ज्याने ब्रह्माचा साक्षात्कार होतो त्याला उपनिषद् म्हणतात. अमर कोशकार म्हणतात–

"धर्मे रहस्युपनिषद् स्यात ।"

**अर्थ :** ज्यात धर्म एवं रहस्य असा अर्थ अभिप्रेत आहे. भगवतगीतेतही 'आचार्योपासना' सांगितली आहे.

**विषय :** वरील व्युत्पत्तीवरून सहजच लक्षात येईल की, उपनिषदांचा विषय हा 'लौकिक' (Material) नाही. त्यात प्रापंचिक प्रश्नांची उत्तरें नाहीत. अलौकिक पातळीवर जाऊन "ब्रह्मज्ञान विषयक" प्रश्नांची उत्त-रे मिळविणे, हे त्याचे ध्येय. श्रीमद् शंकराचार्यांनी मुण्डक उपनिषदाचे भाष्याते - अविद्या शिथिल करणारी संसारभ्रम विनाश करणारी आणि ब्रह्मविद्या प्रदायक परमज्ञान असे उपनिषदात्मक ज्ञानाचे स्वरूप स्पष्ट केले आहे. तीच भूमिका घेऊन प.पू. श्री अभिनव सच्चिदानंद तीर्थ स्वामी महाराज (द्वारकापीठ) यांनीही उपनिषदांवर भाष्य केले आहे. ते असे

**"उपनिषादयति संसारकारणभूतां**
**अविद्यां च शिथिलयति,**
**सर्वानर्थकर संसारं विनाशयति**
**ब्रह्मं च गमयति, इति उपनिषद्"** (कल्याण अंक)

असे हे दिव्य ज्ञान कुणाकडून मिळवावे? उपनिषदात याचे मार्गदर्शन आहे. हे 'दिव्यज्ञान' प्राप्त करून घेण्यासाठी प्रज्ञावंत, ब्रह्मानंदानुभव संपन्न अशा सद्गुरुकडून ते प्राप्त करून घ्यावे. मुण्डक उपनिषदात सांगितले आहे.

**"तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत।**
**समीत्पाणि: श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्"**।। (मुण्डक १-२-१)

अशा प्रकारच्या आत्मज्ञानी, ब्रह्मज्ञानी गुरुंकडून मिळालेले ज्ञान साधकाला दिव्यज्ञानाच्या क्षेत्रांत घेऊन जाते. त्याला ब्रह्मज्ञानाची अनुभूति मिळते, त्याचा सारा अहंकार गळून पडतो, त्याला खऱ्या ज्ञानाची अनुभूति मिळते. दंभ, शुष्कज्ञान, गळून पडते. त्याला नित्य सत्याची प्रचिती येते. भगवंतांनीही अशाच आत्मज्ञानी सद्गुरुकडे जाण्याचा उपदेश केलेला आहे–

**"तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वं दर्शिन:।।** (भ.गी. ४.३४)

**अर्थ :** सद्गुरुंना साष्टांग नमस्कार करून, त्यांची सेवा करून, निष्कपट भावनेने त्यांना प्रश्न विचारून, "ते" ज्ञान तूं समजावून घे! ते तत्त्व जाणणारे ज्ञानी पुरुष तुला (त्या) ज्ञानाचा उपदेश करतील. याचा अर्थच असा की, तत्त्वज्ञानी प्रज्ञावंत महर्षी व तत्त्व जिज्ञासू अभ्यासक यांचे हृदय-संवाद म्हणजे "उपनिषदें" होत!

**उपनिषदे : निर्मिती व हेतू :**

उपनिषदांना "वेदांत" असेही म्हणतात. कारण ती वेदांच्या शेवटी आलेली आहेत. वेद+अंत = वेदांत. विज्ञानपूर्व काळात वैदिक-धर्म हाच सामाजिक जीवनाचा मानबिंदू होता. वेदांत जे जे सांगितलेले आहेत, त्यात जी मार्गदर्शन तत्त्वे सांगितली आहेत, जीवन जगण्याची पद्धती सांगितली आहे. ते सामाजिक जीवनाचे सर्वस्व होते व त्याचाच विलक्षण पगडा मानवी जीवनावर होता - आजही आहे. त्यातही "यज्ञ-संस्था" अत्यंत महत्त्वाची, "यज्ञ" हाच भारतीय जीवनाचा "धर्म" बनला होता.

**"यज्ञेन यज्ञमयजन्त देवाऽस्तानि धर्माणि प्रथमान्यासन्"**

हे श्रुतिवाक्य सर्व श्रुत आहे. "यज्ञ" हाच वेदविहित आद्य धर्म बनला होता. विविध प्रकारच्या 'प्राप्तीसाठी' विविध यज्ञ केले जात होते. अर्थातच त्याचे स्वरूप "कर्मकाण्डात्मक" होते. त्यात "यज्ञ कर्म" प्रधान होते. काल प्रवाहात या यज्ञ संस्थेचा मूळ उद्देश मागे पडला, व कर्मकाण्डाला महत्त्व प्राप्त झाले. खऱ्या वैदिक धर्मापासून समाज दूर जाऊ लागला. कर्मकाण्डाचे स्तोम माजले, त्यामुळे सामाजिक जीवन कमालीचे 'आत्मकेंद्रित' होऊन खऱ्या धर्माचा समाजाला विसर पडला. याची तुलना 'मध्य-युगीन' काळाशी केल्यावर फारसे वावगे होणार नाही. मध्य युगातही हीच परिस्थिति निर्माण झाली होती. तुकोबांचे परखड विचार या बाबतीत मननीय आहेत.

**"अर्थे लोपली पुराणे । नाश केला शद्बज्ञाने**
**विषय लोभी मने । साधने बुडविली।।"**

परंतु दुर्दैवाने त्याकडे कोणीही लक्ष दिले नाही. संताची भूमिका कोणीही समजावून घेतली नाही व संतांचा केवळ 'आक्रोश'च शिल्लक राहिला! 'न कश्चित् श्रृणोति माम्' असे निराशाजनक उद्‌गार भगवान व्यासांनी काढले नसते. हीच मानसिकता उपनिषद्‌कालीन ऋषींची झाली व त्यांनी एका नव्या विचारांना - एका नव्या तत्त्वज्ञाना-ला जन्म दिला. वेदांतील आवश्यक तत्त्वज्ञान आत्मसात करून त्यांनी नवे 'ज्ञान काण्ड' निर्माण केले व सृष्टीतील अत्यंत गूढ अनाकलनीय असे 'ब्रह्म विषयक' ज्ञान त्यांनी उपनिषदाच्या रुपात मांडले. म्हणून उपनिषदांचे स्वरूप 'ज्ञानात्मक' आहे. त्यात मानवी जीवनाचे अंतिम ध्येय 'मोक्ष' याचाच विचार केला आहे. त्यासाठी माणसाला यथार्थ ज्ञान मिळविण्याची आवश्यकता आहे आणि हेच

मानवाला संसार-सागरातून तारून नेऊ शकेल. म्हणून उपनिषदें म्हणतात- 'आत्मानं विध्दी' - 'आत्म्याला जाण'. एकदा आत्मज्ञान झाले म्हणजे जीवनातील अनेक प्रश्न आपोआप सुटतात व जीवन मंगलमय, पवित्र, शुध्द, सत्त्वशील व आनंदमय होईल. म्हणून ऋषींनी उपनिषदांचा अहिंसक मार्ग दाखवून जगाला एक नवा प्रकाश दिला - एक नवी दिशा दिली. एक नवे ज्ञान दिले. मानवाने 'मोक्षा'साठी अशाश्वत, जड, सांसारिक पदार्थांचा त्याग करून शाश्वत-विज्ञान धन, आनंदमय आत्म्याला ओळखून दिव्य व सनातन ज्ञान मिळवावे हेच उपनिषदात विहीत आहे. विद्या व अविद्या यांचा फरक लक्षात घेऊन अविद्येने मृत्यू व विद्येने अमृततत्त्व प्राप्त होते.

ईशावास्यउपनिषदात म्हटले आहे–

**अविद्यया मृत्युतीर्त्वा विद्ययामृतमश्नुते।।** (ईशा. १४)

हाच उपनिषदांचा हेतू-उद्देश्य!

■■■

## शेती

# चला शाश्वत शेतीच्या वाटेवर एक पाऊल...

**श्री. कल्याणसिंह पाटील - ९४०४४०७६४९**

आपल्याला माहीतच आहे की, भारतीय परंपरा ही फार जुनी आहे. हे कृषी पराशर, वृक्षसंहिता, अर्थवेद इत्यादी प्राचीन ग्रंथांवरून स्पष्ट होते. प्राचीन काळापासून ते रासायनिक खतांचा वापर सुरू होईपर्यंत, जनावरांच्या शेणापासून तयार झालेले शेणखत, शेतीतील पिकांचे उरलेले अवशेष तसेच विविध प्रकारच्या पेंडी यांचा वापर करून भारतीय शेतकरी हरितक्रांती सुरू झाल्यापासून मोठ्या प्रमाणात करू लागले. तसेच अधिक उत्पादन देणाऱ्या अन्नधान्याच्या संकरित जातींच्या शोधामुळे खऱ्या अर्थाने हरितक्रांतीची बिजे रोवली गेली आणि भारत देश अन्नधान्याच्या बाबतीत स्वयंपूर्ण झाला.

सद्यस्थितीत अधिक उत्पादनाच्या कारणास्तव शेतकरी विविध प्रकारचे संकरित वाण, रासायनिक खते, संप्रेरके, विषारी कीटकनाशके, तृणनाशके, कृत्रिम भुसुधारके, नांगरणी व चिखलणीसाठी ट्रॅक्टर व पॉवर ट्रिलर यासारख्या आधुनिक साधनांचा वापर दिवसेंदिवस वाढवत चालला आहे. त्यांच्या वापरामुळे पीक उत्पादनात प्रारंभी वाढ होत असली तरी त्यांच्या अवाजवी उपयोगामुळे निसर्गातील साधनसंपत्तीच्या घटकांच्या गुणात्मक दर्जावर विपरीत परिणाम घडत आहे. याची कारणे म्हणजे जमिनीतील सेंद्रिय कर्बात घट होणे, जमिनीची धूप होणे, जमिनीतील अन्नद्रव्यांचा ऱ्हास होणे, अन्नद्रव्यांच्या प्रमाणात असंतुलन होणे, माती आणि पाण्याचे प्रदूषण होणे, जमिनीतील उपयुक्त जीवाणूंचे प्रमाण व त्याची विविधता यांचा ऱ्हास होणे यामुळे रोगकिडींचा प्रादुर्भाव वगैरे समस्या निर्माण होत आहेत. या सर्व विपरीत परिणामांमुळे पर्यावरणप्रेमी शेतकरी व कृषी शास्त्रज्ञ प्रचलित शेतीतंत्राचा पुनर्विचार करू लागले. त्यातूनच शाश्वत शेती, चिरंतन शेती यासारखी संकल्पना आधुनिक कृषी व्यवस्थेला पर्याय म्हणून पुढे येऊ लागली.

शाश्वत शेती निसर्गातील विविध तत्त्वांवर आधारित आहे. या पद्धतीत रासायनिक खतांचा वापर कमी करून अथवा कमी टाकून शेतात कृषी व तत्सम उत्पादनांवर आधारित उद्योगामधून निर्माण झालेल्या सेंद्रिय पदार्थांचा अधिकाधिक व कार्यक्षम पद्धतीने वापर करतात. त्यासाठी शेतातील काडीकचरा, धसकटे, तण, जनावरांचे मलमूत्र, अवशेष इत्यादी शेतात अथवा शेताबाहेर कुजवून सेंद्रिय खतांची निर्मिती केली जाते. शेतात ताग, धैंचा यासारख्या हिरवळींच्या पिकांची बियाणी पेरून ती जमिनीत गाडली जातात. डाळवर्गीय पिकांमध्ये जमिनीत नत्राचे स्थिरीकरण मोठ्या प्रमाणात होत असल्यामुळे या पिकांचा अंतर्भाव पीक पद्धतीमध्ये केला जातो. शेतीमध्ये प्रामुख्याने शेतजमिनीच्या वरच्या १५ ते २० सें.मी. थराची सुपीकता राखणे ही महत्त्वाची बाब आहे.

शेतजमिनीच्या सुपीकतेची पातळी तिच्यातील कर्बाचे प्रमाण, सूक्ष्म जीवाणूंची संख्या त्यांची

कार्यक्षमता व त्यांना पोषक वातावरण या गोष्टींवर अवलंबून असते. ते सूक्ष्म जीवाणू सेंद्रिय पदार्थाचे विघटन करून ह्युमसची निर्मिती करतात. ह्युमसचे प्रमाण जमिनीत जेवढे अधिक तेवढी ती जमीन जास्त सुपीक व पीक उत्पादनक्षमता ठरवले जाते. म्हणूनच शाश्वत शेतीमध्ये रासायनिक खतांबरोबरच सेंद्रिय आणि जीवाणू खतांचा वापर करणे ही अत्यंत महत्त्वाची बाब आहे. शाश्वत शेतीमध्ये पिकांची लागवड किंवा पेरणी करण्यापूर्वी जमिनीची मशागत झाल्यानंतर सेंद्रिय खते जमिनीत मिसळली जातात. या सेंद्रिय खतांमध्ये मुख्यत्वे खालील खतांचा वापर केला जातो. सेंद्रिय खतांमध्ये महत्त्वाची खते म्हणजे शेणखत, कंपोस्ट, हिरवळीची खते, गांडूळ खते, माशांचे खत, हाडांचे खत, खाटिक खाण्याचे खत, तेलबियांची पेंड इत्यादी खतांचा समावेश होतो. पिकांचे किंवा जनावरांचे अवशेष, जनावरांची विष्ठा यांना कुजवल्यानंतर जो सेंद्रिय पदार्थ तयार होतो, त्याला 'सेंद्रिय खत' असे म्हणतात.

जमिनीतील सूक्ष्मजीव जिवंत राहण्याकरिता जमिनीमध्ये कुजलेले, अर्ध कुजलेले सेंद्रिय पदार्थ सतत मातीच्या थरामध्ये असणे आवश्यक आहे. सेंद्रिय पदार्थांना कुजविण्याची क्रिया ही जैविक असून त्यामध्ये वेगवेगळ्या प्रकारचे जीवाणू, बुरशी, अ‍ॅक्टोनोमायसीट्स, प्रोटोझुवा इत्यादी सुक्ष्म जंतू कार्यक्षम असतात.

**सेंद्रीय खताचे फायदे पुढील प्रमाणे :**

१. जमिनीचा पोत सुधारून तिची उत्पादन क्षमता टिकते व वाढते.
२. सेंद्रीय खतांच्या वापरामुळे पिकांच्या वाढीस आवश्यक असलेली सर्वच अन्नद्रव्ये उपलब्ध होतात.
३. सेंद्रीय खतांमुळे अन्न-द्रव्यपुरवठ्या बरोबरच मातीच्या कणांची घडण बदलून जमिनीचा पोत सुधारतो.
४. सेंद्रीय खतांमुळे जमिनीत हवा खेळती राहते व जमिनीचे तापमान कमी राहते.
५. सेंद्रीय खतांमुळे जमिनीतील उपयुक्त जीवाणूच्या संख्येत व कार्यक्षमतेत वाढ होते. त्यामुळे अन्नद्रव्याच्या उपलब्धतेत वाढ होते.
६. सेंद्रीय खतांमुळे जमिनीची जलधारण क्षमता व निचराशक्ती सुधारते.
७. सेंद्रीय खतांमुळे जमिनीच्या प्राकृतिक, रासायनिक व जैविक गुणधर्मांमध्ये सुधारणा घडून पीक उत्पादनात वाढ होते.

**सेंद्रिय खते :**

**शेणखत :** जनावरांचे शेण, मूत्र, गोठ्यातील पालापाचोळा इत्यादी घटकांपासून तयार होणाऱ्या खताला शेणखत असे म्हणतात. शेणखतांमध्ये ०.५ टक्के नत्र, ०.२ टक्के स्फुरद व ०.५ टक्के पालाश असते. डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ. दापोलीने आपल्या कृषी दैनंदिनीमध्ये प्रत्येक पिकाला रासायनिक खतांच्या मात्रेसोबत शेणखत वापरण्याचा सल्ला दिला आहे. शेणखतांचे प्रमाण सर्वच पिकांना सारखे नसून जास्त उत्पादन देणाऱ्या पिकाला शेणखत अधिक घालावे. तसेच वर्षातून दोन किंवा तीन पिके घेण्यात येणाऱ्या शेतात शेणखत जास्त घालावे.

**कंपोस्ट खत :** शेतातील गवत, पिकांचे कापणीनंतर उरलेले अवशेष, भुसउसाचे पाचट, कापसाची धसकटे ध. सेंद्रिय पदार्थांचे सूक्ष्म जीवजंतूमुळे विघटन होऊन, त्यातील कार्बन नत्राचे प्रमाण कमी होते व चांगला कुजलेला पदार्थ तयार होतो, त्याला कंपोस्ट म्हणतात. यामध्ये नत्राचे प्रमाण ०.५ टक्के, स्फुरद ०.१५ टक्के आणि पालाश ०.५ टक्के असते. या सेंद्रिय खताचा वापर शेतीसाठी केल्यास फक्त जमिनीतील अन्नद्रव्यांचे प्रमाण वाढते असे नाही तर जमिनीचा पोत सुधारण्यास मदत होते.

**हिरवळीची खते :** हिरवळीचे खत म्हणजे वनस्पतीचे हिरवे अवशेष. शेतात हिरवळीचे पीक लावून ते जागेवर गाडून किंवा बाहेरून हिरवळींच्या झाडांची पाने किंवा कोवळ्या फांद्या आणून जमिनीत गाडणे होय. याकरिता विविध प्रकारची हिरवळीची पिके शेतात वाढवून ती फुलोऱ्यात येण्यापूर्वीच जमिनीत गाडली जातात. ती जमिनीत पुरल्यानंतर त्यांचे उत्तम असे खत तयार होते. हिरवळीची पिके जमिनीत गाडल्यावर सेंद्रिय पदार्थांचे प्रमाण वाढते. त्यामुळे जमिनीतील उपयुक्त सूक्ष्म जीवाणू कार्यास उत्तेजना देते. हिरवळीची पिके द्विदल वर्गीय असल्यास हवेतील नत्र जमिनीत स्थिरीकरण करण्यास मदत करतात. हिरवळींच्या खतांमध्ये नत्रांचे ०.३ टक्के ते २.४ टक्के प्रमाण असते.

**हिरवळीच्या खतांसाठी वापरण्यात येणारी पिके :**

(१) ताग, (२) धंजा, (३) मूग, (४)

चवळी, (५) गवार, (६) शेवरी, (७) बरसीम, (८) ग्लिरिसिडीया. ग्लिरिसिडीया व तागापासून हेक्टरी ४० ते ५० किलो नत्राचा पुरवठा ५ ते ६ आठवड्यात होतो. तसेच मुगाचा पालापाचोळा जमिनीत गाडल्यामुळे पीक उत्पादनात २५-३० टक्के वाढ होते.

**गांडूळ खत :** सेंद्रिय पदार्थाचे विघटन गांडुळामार्फत करून तयार करण्यात आलेल्या खताला गांडूळ खत म्हणतात. या खतात गांडुळाची विष्ठा, नैसर्गिकरीत्या कुजलेले पदार्थ, गांडुळाची अंडीपुंज आणि अनेक ुपयुक्त जीवाणूंचा समावेश असतो. गांडुळे सेंद्रिय पदार्थाचे सेवन करतात. त्यांचे विघटन करतात व विघटन केलेले पदार्थ विष्ठेमार्फत बाहेर टाकतात. गांडूळ खते जमिनीत वास्तव्य करणाऱ्या उपयुक्त जीवाणूंची कार्यक्षमता वाढवितात. गांडूळ खतामध्ये ह्युमसचे प्रमाण भरपूर असल्याने नत्र, स्फुरद, पालाश व इतर सुक्ष्मद्रव्ये झशडांना भरपूर व लगेच उपलब्ध होतात. तसेच यामुळे जमिनीत हवा खेळती राहून मुळांची वाढ चांगली होते.

सर्वसाधारणपणे तृणधान्ये व कडधान्यांच्या पिकांना हेक्टरी ५ टन या प्रमाणात गांडूळ खत देण्याची शिफरस केलेली आहे. फळझाडे पिकांना हेक्टरी असलेल्या झशडांच्या संख्येनुसार प्रत्येक झाडास विभागून द्यावे. ज्या पिकांमध्ये कमी आंतरमशागत, वर्षभर ओलावा व सावली राहते. अशा पिकांना गांडूळ खतांचा वापर केल्यास पीक निरोगी राहून भरपूर उत्पन्न मिळते.

**माशाचे खत :** समुद्रकिनारी वाया गेलेल्या माशांपासून तसेच माशाचे तेल काढल्यानंतर उरलेल्या अवशेषांपासून जे खत तयार होते, त्याला माशाचे खत म्हणतात.

**खाटीकखान्याचे खत :** खाटीकखान्यात जनावरांचे रक्त व अवशेषापासून जे खत बनवितात, त्याला खाटीकखान्याचे खत असे म्हणतात.

**हाडांचे खत :** हाडे दळून बारीक करतात किंवा हाडांवर पाण्याची वाफ दाबाने सोडतात, वाफेतील उष्णतेमुळे स्निग्ध पदार्थ वेगळे होऊन हाडे मऊ, ठिसूळ बनतात, दळून बारीक करतात. अशा खतांना हाडाचे खत म्हणतात.

**तेलबियांची पेंड :** तेलबियातील तेल काढल्यानंतर जी पेंड राहते, तिचा खत म्हणून वापर करता येतो. उदा. एरंडी, निंब, करंज, भुईमूग, सरकी, महुआ इत्यादी तेलबियांच्या पेंडीमध्ये नत्राचे प्रमाण अधिक असते.

**द्रवरूप खते :** ही खते गोमूत्र तसेच विविध वनस्पतींचा अर्क, ताक, गूळ यापासून तयार करतात. जरी या खतांच्या द्वारे जमिनीला अन्नद्रव्यांचा पुरवठा मोठ्या प्रमाणावर होत नसला तरी या खतांमुळे मातीत फायदेशीर सूक्ष्म जीवाणूंचा संचय व त्याची कार्यमता वाढते.

द्रवरूप खते यामध्ये गांडूळ पाणी (व्हर्मी वॉश) याचा शेतकरी चांगल्या प्रकारे वापर करू शकतात. व्हर्मी वॉश हे गांडूळ खत तयार करताना गोळा केले गाते. याचा रंग पिवळाधम्मक असतो. या द्रव्यात गांडुळाच्या मूत्रातील कोलॅमिक पल्युइट या घटकाचा समावेश असतो. व्हर्मी वॉशमध्ये सूक्ष्म अन्नद्रव्ये, नत्र, स्फुरद व पालाश सेंद्रिय स्वरूपात असल्यामुळे कलमे, फळझाडे व पिके निरोगी राहतात. यामध्ये नत्र १.३२ टक्के, स्फुरद ०.७२ टक्के व पालाश ०.६५ टक्के आहे. वरील सर्व सेंद्रिय खतांप्रमाणेच इतर सेंद्रिय खते म्हणजे खाटिक खाण्यात खते यामध्ये रक्ताचे खत, हाडांचे खत, माशांचे खत यांचाही वापर शाश्वत शेतीत जमिनीची सुपीकता व पोत सुधारण्याकरिता करता येतो.

**जीवाणू खते :** प्रयोगशाळेमध्ये हवेतील नत्र स्थिर करणारे जमिनीतील अविद्राव्य स्फुरद विरघळवणारे व सेंद्रिय पदार्थांचे विघटन करणाऱ्या उपयुक्त अशा कार्यक्षम जीवाणूंची स्वतंत्रपणे वाढ करून योग्य अशा वाहकात विघटन करणाऱ्या ुपयुक्त अशा कार्यक्षम जीवाणूंची स्वतंत्रपणे वाढ करून योग्य अशा वाहकात मिसळून तयार होणाऱ्या खताला जीवाणू खत असे म्हणतात. उदा. रायझोबियम, अ‍ॅझोस्पिरिलम, अ‍ॅझोटोबॅक्टर, निळे-हिरवे शेवाळ, अझोला, स्फुरद विरघळवणारे जीवाणू (पी.एस.बी.) इत्यादी जीवाणू खतांचा समावेश होतो. यांच्या वापरामुळे सेंद्रिय पदार्थाचे विघटन होऊन जमिनीचा पोत सुधारतो. तसेच मातीमधील सुक्ष्म जीवांचे प्रमाण वाढते. यामुळे बियाणांची उगवण लवकर व चांगली होते.

**रायझोबियम :** रायझोबियम जीवाणूंना सहयोगी

नत्र स्थिर करणारे जीवाणू म्हणतात. हे जीवन द्विदल वनस्पतीच्या मुळांवर गाठी तयार करून त्यामध्ये राहतात. हे जीवाणू वनस्पतीकडून त्यांना लागणारे अन्न मिळवितात व हवेतील नत्र अमोनियाच्या स्वरूपात पिकांना उपलब्ध करून देतात.

हे नत्र तयार करण्यासाठी कडधान्यांच्या मुळावरील उपयुक्त कार्यक्षम जीवाणू अलग करून विशिष्ट प्रकारच्या माध्यमातून त्यांची मोठ्या प्रमाणावर वाढ करून निर्जंतुक केलेल्या लिग्नाईट पावडरमध्ये मिसळून होणाऱ्या खताला रायझोबियम जीवाणू असे म्हणतात.

**ॲझोटॉबॅक्टर :** सर्व एकदल वर्गीय पिकांना नत्राचा पुरवठा करण्यासाठी ॲझोटॉबॅक्टर जीवाणू खतांचा फायदा होतो. उदा. कापूस, ऊस, ज्वारी, बाजरी, गहू, तृणधान्ये व भाजीपाला इ. जीवाणूखत बनविण्यासाठी ॲझोटॉबॅक्टर जीवाणूची द्रव माध्यमामध्ये वाढ करण्यात येते व लिग्नाईट नावाच्या पावडरमध्येही जीवाणूची वाढ म्हणजेच संवर्धक मिसळले जातात. याच्या वापरामुळे पिकाला नत्राचा सतत पुरवठा होत असल्याने रोपाची वाढ जोमदार होते. तसेच जमिनीतील कर्ब, नत्राचे प्रमाण योग्य राखून जमिनीचा कस सुधारतो.

**ॲझोस्पिरिलम :** ॲझोस्पिरिलम अणुजीव गवत वर्गातील पिके उदा. मका, गहू, बाजरी, ज्वारी, भात, ऊस व चाऱ्याचे गवत यांच्या मुळांमध्ये व मुळांभोवतालच्या भागात प्रामुख्याने आढळतात. या अणुजीवाचे ॲझोस्पिरिलम लिपोफेरम व ॲझोस्पिरिलम ब्रासिलन्स असे दोन प्रकार आहे. या दोन्ही प्रकारच्या अणुजीवांना ॲझोस्पिरिलम असे म्हणतात. हे जीवाणू ॲझोटॉबॅक्टर जीवाणूपेक्षा दीड ते दुपटीपेक्षा जास्त हवेतील नत्र स्थिर करतात.

**अझोला :** अझोला ही नेचेवर्गातील पाणवनस्पती आहे. या वनस्पतीच्या पेशीत नत्र स्थिर करणारी ॲनाबिना अझोली नावाची नील रहित शेवाळ वर्गातील वनस्पती वाढत असते. सहजिवीपणे जगणाऱ्या या वनस्पतीमध्ये ४ ते ५ टक्के नत्र असते. त्याचा भातशेतीस चांगला उपयोग होतो. अझोला वनस्पतीत नत्र व पाण्याचे प्रमाण जास्त असल्याने ते लवकर कुजते व उत्तम सेंद्रिय खत मिळते.

**निळे-हिरवे शेवाळ :** ही एक सूक्ष्मदर्शी एकपेशीय, तंतुमय शरीररचना असलेली गोड्या पाण्यातील स्वयंपोशी पानवनस्पती आहे. हे पाण्यात राहून हवेतील मुक्त स्थितीत असलेला नत्र, हेटरोसीस्ट या विशिष्ट प्रकारच्या शरीररचनेद्वारे स्थिर करतात. योग्य परिस्थितीत निळे-हिरवे शेवाळ प्रतिवर्षी प्रति हेक्टरी ३० किलो नत्र स्थिर करू शकते. तसेच या शेवाळाची वाढ होत असताना तयार झालेली वृद्धिसंप्रेरके व जीवनसत्त्वाचा पिकाच्या वाढीसाठी चांगला उपयोग होतो.

**मायकोरायझा :** मायकोरायझा ही वनस्पतींच्या मुळांवर वाढणारी एक प्रकारची बुरशी आहे. ती वनस्पतीला जमिनीतील स्फुरद उपलब्ध करून देण्याचे कार्य करते व त्या मोबदल्यात वनस्पतीकडून खाद्य मिळविते. ही बुरशी वनस्पतीला जमिनीतील मुळांमध्ये व मुळांबरोबर तंतुमय धशग्यासारखे अनेक दोरे बाहेर तयार करते. हे दोरे मुळांच्या आतील पेशीपासून मुळांबाहेर मातीमध्ये खोलवर दूरवर पसरलेले असतात.

त्याच्या माध्यमातून निरनिराळे आम्लधर्मीय पदार्थ तसेच विकरे जमिनीत सोडली जातात. त्यामुळे जमिनीतील अविद्राव्य स्फुरदाचे विद्राव्य स्फुरदान रूपांतर होते व तो पिकाला पुरवला जातो. याचबरोबर पीकवाढीसाठी उपयुक्त असलेली वाढवर्धक द्रव्ये उदा. हार्मोन्स, ऑक्झिन्स, सायलेकायनिन्स इत्यादी तयार केली जावून ती पिकांना उपलब्ध होतात.

वरील जीवाणू खतांचा वापर शाश्वत शेतीमध्ये पुढीलप्रमाणे करावा.

**बियाणाभोवती लेप देणे:** पेरणीपूर्वी जीवाणू खत १ टक्का गुळाच्या द्रावणात मिसळून ते बियाणास चोळून सावलीत सुकवावे. तृणधान्य पिकांसाठी १५ किलो बियाण्यामागे २५० ग्रॅम व द्विदल बियाण्याकरिता १० किलो मागे २५० ग्रॅम जीवाणू खत वापरावे.

मातीतून देणे : पेरणी किंवा पुनर्लागवडीच्या वेळी जावाणू खते २० किलो मातीत किंवा चांगल्या कुजलेल्या सेंद्रिय खतात मिसळून शेतात फषकून द्यावे व त्यानंतर पाणी द्यावे.

खतातून देणे : फळपिकांसाठी २० ते २५ ग्रॅम जैविक संवर्धन ५ किलो कंपोस्ट किंवा शेणखतात मिसळून बांगडी पद्धतीने द्यावे व त्यानंतर पाणी द्यावे.

अशा प्रकारे जीवाणू खतांचा वापर केल्यास बियाण्याची उगवण लवकर व चांगली होते. पिकांची वाढ जोमदार होण्यास मदत होते. जमिनीचा पोत सुधारतो. पिकांची रोगप्रतिकारक शक्ती वाढते आणि महत्त्वाचे म्हणजे रासायनिक नत्र खताची २० ते २५ टक्क्यांपर्यंत बचत होते. तसेच पीक उत्पादनात १५ ते २० टक्क्यांनी वाढ होते.

अशा प्रकारच्या सर्व उपाययोजनांचा अवलंब करून सेंद्रिय शेती किफायतशीर बनवता येते. आज एकाच प्रकारच्या किंवा रासायनिक शेतीपद्धतीमधील तोटे निदर्शनास येऊ लागले आहेत. हे तोटे कमी करण्यासाठी व जमिनीचे आरोग्य चिरकाल उत्तम राहण्यासाठी शाश्वत शेती हा एक चांगला पर्याय पुढे येत आहे. सेंद्रिय शेतीद्वारे जमिनीतील सुपीकता व उत्पादकता कायमस्वरूपी टिकवणे शक्य होत आहे. त्यामुळेच आपण या सेंद्रिय गोष्टींचा वापर करून शेतीला शाश्वत शेती बनवू शकतो.

| पिके | जीवाणू खत |
|---|---|
| **सोयाबीन** | (रायझोबियम) जापोनिकम, (रायझोबियम) इटलाय, (रायझोबियम) फ्रिडाई |
| **वाटाणा** | (रायझोबियम) लग्युमिनोसायरम |
| **चवळी, मुग, तूर मटकी इ.** | (रायझोबियम) बरसीम, (रायझोबियम) ट्रायफेली |
| **फ्रेंच बीन / बीन** | (रायझोबियम) फॅझिओलाय |

## आश्रम - प्रेम आणि सेवेचे पवित्र स्थान

आपण एक मोठे कुटुंब आहोत. हे सद्गुरुंचे कुटुंब किंवा विश्वव्यापक कुटुंब आहे. गुरुने आश्रमामध्ये आपल्याला एकत्र आणले आहे. त्यांनी आपल्याला भौतिक आणि आध्यात्मिक गरजा पुरवल्या आहेत. सद्गुरुंनी आपल्याला पुरविलेल्या सुविधेचा आपण खरोखर सद्उपयोग करून घेतो की नाही? आपण भौतिक सुविधांचा उपभोग घेत आहोत, पण आध्यात्मिक उन्नतीसाठी पुरविलेल्या सुविधांचा वापर आपण करीत आहोत का?

गुरुंनी आपल्याला परस्पर प्रेमाने वागणे, एकमेकांची सेवा करणे आणि बाहेरून आलेल्या लोकांची सेवा करणे, यासाठी संधी उपलब्ध करून दिलेली आहे. जेणेकरून आपली दृष्टी विशाल करून शेवटी विश्वप्रेम आणि विश्वसेवेचा लाभ मिळावा. आपण त्यासाठी सद्गुरुंनी उपलब्ध करून दिलेल्या सुविधांचा पुरेपूर वापर करून अखंड रामनाम आणि सद्गुरुस्वरूप साधकांची सेवा कशी करता येईल ते पाहिले पाहिजे. आपणा सर्वांना शांती पाहिजे. ती शाश्वत शांती आपल्याजवळ सदैव वास करेल. केवळ आश्रममध्ये राहून ती शांती प्राप्त होणार नाही, हे लक्षात घेऊ या. जर आपण आश्रमला येणाऱ्या भक्तांची सेवा केली नाही, तर आपण अशा सेवेला वंचित होऊ. प्रत्येकानी लक्षात घ्यावे की आश्रम हे पवित्र स्थान आहे आणि जे काही आपण येथे करू, त्यामुळे आपल्याला ईश्वरसाक्षात्काराचे अत्युच्च ध्येय गाठण्यास मदत झाली पाहिजे. खालील शब्द प्रत्यक्ष कृतीत आणण्याचा सतत प्रयत्न झाला पाहिजे.

'जर कांही गोष्टी चुकीची झाली तर आपल्यापैकी कोणीही त्यासाठी दोषीत अंगुलीनिर्देश करता कामा नये. कोणाला दोष द्यायचा हे महत्वाचे नाही तर आपण परिस्थिती कशी करायची हे महत्वाचे आहे.'

ईश्वराचे नामस्मरण, भजन करणे आणि ऐकणे, स्वाध्याय, आश्रम इमारतीतील व्यवस्था, व्यवस्थापनात शक्य ती मदत. या आध्यात्मिक सेवेत आश्रमातील सेवेकऱ्याने स्वत:ला गुंतवून घेतले पाहिजे. यामुळे एखाद्याच्या जीवनात या सेवेची गोडी मिसळल्याने आध्यात्मिक उत्कटता निर्माण होते. आठवड्यातून एक दिवस मौन पाळणे अतिशय सहाय्यकारक ठरते.

आपण दिवसभरात काय काय केले, कोणाकोणाशी प्रेमाने बोललो, कोणाची सेवा केली किंवा कोणामध्ये दोष पाहिला आणि वादविवाद केला, याबद्दल रोज संध्याकाळी विचार करावा. सद्गुरुला प्रार्थना करून आपल्या घडलेल्या चुकांचे परिमार्जन करावे.

**-स्वामी सच्चिदानंद**

# श्रीक्षेत्र कुबेर भंडारी : धनदेवता कुबेराचे जागृत मंदिर

डॉ. प्रिया मालवणकर - ९७६९१६७९२५

कुबेर म्हणजे कोण? कुबेर म्हणजे धनाची देवता आणि देवांचा खनिजदार. कुबेर म्हणजे लक्ष्मीचे तृतीय क्रमांकाचे पुत्र, महादेव शिवशंभुचे भक्त आणि मित्र. प्राचीन काळापासून कुबेराची उपासना धनप्राप्तीसाठी आणि द्रव्यसंकटासाठी गेली जाते. अशा या धनदेवता कुबेराचे एकमेव प्रख्यात मंदिर श्रीलंका येथे आहे. तर भारतातील अत्यंत जागरूक असे एकमेव मंदिर गुजरातमधील नर्मदा तिरावर असलेल्या करनाळी डोंगरावर स्वयंभू शिवलिंगाच्या स्वरूपात आहे. या मंदिरात सलग पाच अमावस्या दर्शन घेणाऱ्याचे द्रव्य संकट व अन्य समस्यापासून रक्षण होते.



शिवलीलामृत हा महादेव शंकराचा विविध शिवस्वरुपाचे वर्णन असलेला, शिव प्रेमींचा अत्यंत आवडता असा महान ग्रंथ आहे. या ग्रंथात कुबेरेश्वर लिंगाचा उल्लेख आपल्याला वाचायला मिळतो. हेच ते गुजरातमधील करनाळी डोंगरावर वसलेले कुबेरेश्वरधीश. या मंदिरास कुबेर भंडारी असे म्हटले जाते.

देवाचे सर्व प्रकारचे भांडार सांभाळण्याचे काम कुबेर करत असल्यामुळे त्याला भंडारी असे संबोधण्यात येते. म्हणून या मंदिरास कुबेर भंडारी असे म्हणतात. या ठिकाणी धनदेवता कुबेर लिंग स्वरूपात तेथे वास करीत असून या स्वयंभू कुबेरेश्वर लींगाचा तब्बल २५०० वर्षांपूर्वीचा इतिहास आहे. त्याबाबतची कथा पुढीलप्रमाणे आहे.

### कुबेरेश्वर लींगाचा इतिहास

भगवान कुबेर हा रावणाचा सावत्र मोठा भाऊ होता. ब्रह्मदेवाच्या आशीर्वादाने त्याचाच पणतु असलेल्या कुबेरास सोन्याची लंका आणि पुष्पक विमान प्राप्त झाले होते. कुबेराने हजारो वर्ष केलेल्या घनघोर तपामुळे देवांचा स्थापत्य विभागाचा कर्मयोगी विश्वकर्मा याने देवराज इंद्रासाठी तयार केलेली सोन्याची लंका आणि पुष्पक विमान ब्रह्मदेवानी कुबेरास आशीर्वाद म्हणून दिले. पुढे कुबेराचा सावत्र भाऊ रावण याने त्याचा युद्धात पराभव करून सोन्याची लंका व पुष्पक विमान हस्तगत केले व कुबेरास परागंदा केले. कुबेर पुन्हा ब्रह्मदेवाकडे गेले व परत लंका व पुष्पक विमान मागू लागले.

ब्रह्मदेव म्हणाले, आता मी पुन्हा लंका व पुष्पक विमान देऊ शकत नाही. त्याबद्दल तुला मी मुंगुस वाहन म्हणून देत आहे. अलकापुरीचा राजा म्हणून तू नाद. पुढे कुबेर तपश्चर्या करता-करता याच करनाळी डोंगरावर उग्र तपश्चर्येसाठी बसले. हा करनाळी डोंगर त्यावेळी महान तपस्वी लोकांची कर्मभूमी होती. एवढेच काय या डोंगरावर त्यावेळी शिव-पार्वतीचा सुद्धा वास होता. त्यावेळी या डोंगरावर अन्नपाण्याची वाणवा होती. त्यामुळे शिवशंभो यांनी तेथे भंडारा म्हणजे अन्नदान केले. कुबेराच्या उग्र तपाने शिव त्याला प्रसन्न झाले. त्यांनी कुबेरास तुला काय आशीर्वाद देऊ असे विचारले? कुबेरानी शिवपार्वतीकडे असा आशीर्वाद मागितला की, तुम्ही माझ्या नावाने येथे लिंग रुपाने वास्तव्य करावे. शंकाराने तथास्थु म्हणून येथे कुबेराच्या नावाने आपण स्वयंभू लींगरुपात वास करू असे अभिवचन कुबेरास दिले. कुबेराला त्याच्या सावत्र भाऊ रावणाच्या त्रासापासून मुक्ती मिळविण्यासाठी अंबामातेची तपश्चर्या करण्यास सांगितली. कुबेरांनी अंबामातेची तपश्चर्या करून तिला प्रसन्न करून घेतले. आणि आशीर्वाद म्हणून तिचे संरक्षणकवच मिळविले.

### कुबेर भंडारी मंदिराची रचना

श्री कुबेर भंडारी मंदिरात मध्यभागी शिवाचे

स्वयंभू लींग असून त्याच्यावर शेष नाग आहे. कुबेराच्या नावाने शिवरूप यात वास केले हेच ते कुबेरेश्वर लींग. या कुबेरेश्वर लींगावर वेगवेगळे कुबेराचे मुखवटे घातले जातात. मागील बाजूला अंबामातेची मूर्ती आहे. हे मंदिर करनाळी डोंगरावर अत्यंत दुर्गम ठिकाणी आहे. या मंदिरात जाण्यासाठी होडीने नर्मदा नदी पार करून कैक पायऱ्या चढून वर जावे लागते. दुसरा मार्ग रस्त्याने जाणाच्या उपलब्ध आहे. छोट्या गाड्या बस मंदिरापासून काही अंतरावर थांबवून मंदिरात जाता येते.

**कुबेराचे दर्शन शरण योग**

कुबेरेश्वर लींगाचे अमावस्येला दर्शन घेण्याची पूर्वापार प्रथा आहे. सलग पाच अमावस्या कुबेरभंडारीचे दर्शन घेतल्यावर इष्ट मनोकामनेची पूर्तता होते, असा भारतातील लाखो भाविकांचा अनुभव आहे. अमावस्या ही दारिद्र्य नष्ट करणारी तिथी हिंदु धर्म संस्कृतीत मांडण्यात आली आहे. अमावस्या ही लक्ष्मीदेवीची अत्यंत प्रिय तिथी असून लक्ष्मीपुत्र कुबेराचे अमावस्येला घेतलेले दर्शन द्रव्यसंकट दूर होऱ्यास फलद्रुप होते. म्हणून सलग पाच अमावस्या कुबेरभंडारीचे दर्शन घेतल्यास द्रव्य संकट तसेच अनेक समस्या दूर होतात. अमावस्येला दर्शन घेणाऱ्या या योगाला दर्शनशरण योग असे म्हणतात.

**कुबेराच्या दर्शनाला लाखोंची झुंबड**

महिन्यातून एकदा येणाऱ्या प्रत्येक अमावस्येला कुबेरभंडारी येथे भारताच्या कानाकोपऱ्यातून भावीक येत असतात. यात महाराष्ट्र, मुंबई, ठाणे व इतर ठिकाणाहून लाखोंच्या संख्येने भाविकांची झुंबड असते. कुबेरभंडारीला मनःपूर्वक शरण गेल्यावर प्रत्येकाची मनोकामना पूर्ण झालेली आपल्यास पाहायला मिळते.

**मंदिराचे वैशिष्ट्य**

गुजरातमधील नर्मदा किनारी वसलेले कुबेरभंडारी मंदिराची यात्रा करणे ही अत्यंत श्रमदायी अशी गोष्ट आहे. हा भाग अत्यंत अविकसित दुर्गम असा आहे. या ठिकाणी शानशौकीच्या कुठल्याही गोष्टी नाही. मंदिराच्या पायऱ्या चढून मंदिरात प्रवेश करण्यासाठी व्यक्तीमध्ये धीर-शांती आवश्यक आहे. कारण अत्यंत जागरूक मंदिर असले तरी कोणत्याही विशेष सुविधा उपलब्ध नाही. असे असले तरी महत्वाचे वैशिष्ट्य म्हणजे आबालवृद्ध आपली दुखणीखुपणी विसरून त्याचप्रमाणे शारीरिक मानसिक त्रास विसरून श्री कुबेरभंडारीचे दर्शन घेतात. व त्रासातून मुक्ती मिळवितात.

**दर्शनाआधी नर्मदा स्नान**

अमावस्येला नर्मदा नदीत स्नान केल्यामुळे दारिद्र्य दुःखाचे हरण होते. आर्थिक अडचणी दूर होतात, असा दृढ पूर्वापार समज आहे. नर्मदा नदी शिवशंभोची मानस कन्या असून अमावस्येला नर्मदा स्नान केल्यास पुण्यप्राप्ती होऊन आर्थिक प्रश्नांचे उत्तर कुबेरश्वराचे दर्शन घेण्याअगोदर नर्मदा स्नान करणे गरजेचे आहे. म्हणून ही प्रथा आहे.

**यात्रेस कसे जावे?**

श्रीक्षेत्र कुबेरभंडारीची यात्रा ही अत्यंत कष्टदायक आहे. हा संपूर्ण परिसर दुर्गम व सोयीसुविधाविरहित असल्या कारणाने कोणतीही मोठी प्रवास कंपनी येथे यात्रा काढण्यास धजावत नाही. मुंबई ठाणे जिल्हा तसेच आसपासच्या भागातून सेवानिवृत्त, मरीन इंजीनियर श्री. विलास पाटील हे श्रीक्षेत्र कुबेरभंडारीचे प्रसाराचे महत्वपूर्ण कार्य करीत आहेत. ते प्रत्येक महिन्याच्या पौर्णिमा व अमावस्येला श्रीक्षेत्र कुबेरभंडारी या दोन दिवसाच्या यात्रेचे आयोजन करीत असतात. ज्या भाविकांना कुबेरभंडारी यात्रेस जावयाचे आहे, त्यांनी श्री. विलास पाटील यांच्याशी पुढील भ्रमणध्वनीवर संपर्क साधावा. (९८६९८३१५२६, ९८६९२२६४२०) ते आपल्याला यात्रेसंबंधी उचित मार्गदर्शन करतील.

**कुबेरेश्वराची दिव्य अनुभूती**

ब्रह्मदेव व शिवाच्या आशीर्वादाने कुबेर यांना उत्तर दिशेचे स्वामीत्व मिळाले. चार लोपालपैकी कुबेर एक आहे : तो यक्षांचा राजा आहे. ब्रह्मदेवाचे पणतु असून पुलस्य ऋषींचे नातू आहेत. विश्वैय्या मुनि इलिवडा यांचे पिता असून रावण हे त्याचे सावत्र भाऊ आहे. कुबेराने महालक्ष्मीला प्रसन्न केले. ऐश्वर्यलक्ष्मीचे व्रत केल्यामुळे त्यांना ऐश्वर्य, धनभांडार प्राप्त झाले. ब्रह्मदेवाने दिलेला वाहनरूपी मुंगूस हा धनप्राप्तीचे सूचक आहे. कुबेराचे वाहन असल्यामुळे मुंगुसाचे दर्शन झाल्यावर आपल्याला धनप्राप्ती होते. अत्यंत शुभफलदायी असलेल्या मुंगुसाचे दर्शन मात्र आपल्याला क्वचितच होते. तरी सर्व वाचकांनी एकदा श्रीक्षेत्र कुबेरभंडारी येथे आवर्जुन जावे व समस्यामुक्तीची दिव्य अनुभूती घ्यावी.

■■■



अखंड मंडलाकारं व्याप्तं येन चराचरम्, तत्पदं दर्शितं येन तस्मै श्री गुरुवे नमः।
जगा मध्ये अज्ञानाचा नाश करून ज्ञानाचा प्रसार करण्याकरिता
श्रीदत्त प्रभुंचा गुरुस्वरुप अवतार झाला व श्रीदत्तप्रभूंचे कार्य अनेक संतांच्या
स्वरुपात सुरु आहे.

– प. पू. श्री. दादामहाराज झुरळे

**हि सेवा डॉ. श्री. जयंत पांडुरंग गोखले यांच्याकडून सद्गुरु चरणी रुजू**

Reg. News Paper R.N.I. No. MAHMAR / 48634

Santosh Shamrao Joshi - Printer / Publisher & Owner of the newspaper entitled "Gurutattva" to be printed at Uniprint, Chintamani, Opp. Namaskar Mandal, Agara Road, Kalyan (W) 421 301 and published at C/106, Ayodhya Darshan Soc., New Ayre Road, Opp. Sai Temple, Dombivli (E) Dist - Thane, Maharashtra 421 201. Editor : Shri.



**If not delivered please send to :**
**Sadguru Printers & Publication**
C/o. Mr. Santosh S. Joshi, C-106, Ayodha Darshan, Opp. Sai Baba Temple, New Ayre Toad, Dombivli (E), Dist-Thane 421 201.